# भारतीय चलनपद्धति

अर्थात

## हिंदुस्थानांतील प्रचलित चलनपद्धतीचें सांगोपांग विवेचन.

शं. ग. खांडेकर.




प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थी पाहिजे पंचीकरण ॥—श्रीरामदास.

# भारतीय चलनपद्धति

अर्थात

## हिंदुस्थानांतील प्रचलित चलनपद्धतीचें सांगोपांग विवेचन.



लेखक

शंकर गणेश खांडेकर,

एम्. ए., एल्. टी., वर्धा.



प्रकाशक

दत्तात्रय गणेश खांडेकर, मालक, ' लॉ प्रिंटिंग प्रेस,"

४४९ शनवार पेठ, पुणें.



१९२१

किंमत १ रुपया.

# अर्पण पत्रिका.

हें पुस्तक

## श्रीमंत लक्ष्मण नरसिंगराव हेबळीकर

ह्यांस

त्यांचें सौजन्य, विद्याभिलाष व लोकांमध्यें ज्ञानप्रसार
करण्यांबद्दल त्यांची उत्कट इच्छा वगैरे गुणांवर
लुब्ध होऊन ग्रंथकर्त्यानें अत्यंत प्रेमपूर्वक
अर्पण केलें असे.



# प्रस्तावना.

—:*२:*—

राष्ट्राच्या चलनपद्धतीकडे सामान्य जनतेचें लक्ष जात नाहीं याचें मुख्य कारण तिचा व्यक्तींच्या रोजच्या व्यवहाराशीं आणि समाजाच्या हिताहिताशीं निकट संबंध आहे, ह्या ज्ञानाचा पूर्ण अभाव होय. रुपये, चलनी नोटा, पावल्या, चवल्या वगैरे किरकोळ नाणीं ह्यांची देवघेव अप्रतिहत रीतीनें चालली असतांना नाणीं कोण पाडतो, त्यांची किंमत कशी ठरविली जाते, परराष्ट्राशीं होणाऱ्या व्यापारी व्यवहारांत त्यांचा विनिमय कसा होतो वगैरे प्रश्न उपस्थित होण्यास अवकाशच नसतो. सूर्य रोज उगवतो आणि मावळतो व त्यासंबंधानें ज्योतिष-शास्त्रविषयक चौकशी करण्याचें कोणाच्याही मनांत येत नाहीं; त्याचप्रमाणें राष्ट्रीय चलनपद्धतीची गोष्ट आहे. परंतु रोजच्या व्यवहारांत नाण्यांच्या बाबतींत कांहीं विशेष अडचण भासूं लागली म्हणजे सदरहु विषयाकडे लोकांचें लक्ष वेधतें आणि ' असें कां होतें? ' हा प्रश्न विचारण्याची प्रवृत्ति सामान्य माणसांतही दिसून येते. सूर्यग्रहणाची मीमांसा राहू-केतूंच्या पौराणिक गोष्टीनें लावण्यांत येऊन तिनें जसें अज्ञ लोकांचें समाधान होतें, तसाच प्रकार चलनपद्धतीसंबंधानें ही कमी अधिक प्रमाणांत होतो व ह्यामुळें जागृत झालेली जिज्ञासा पुनः सुप्त होतें. ज्योतिषाचें ज्ञान लोकांस होणें अवश्यक आहे, त्याहीपेक्षां चलनपद्धती-विषयीं शास्त्रीय माहिती त्यांस उपलब्ध होणें जास्त अगत्याचें आहे. राष्ट्रीय चलनपद्धति सदोष असल्यास त्याचे दुष्परिणाम सर्व जनतेस प्रत्यक्ष किंवा अप्र-त्यक्ष रीतीनें भोगावे लागतात. ह्याकरितां त्या पद्धतीमधील दोष दाखवूनच ते सरकाराकडून नाहींसे करून घेणें हें लोकांचें एक महत्त्वाचें कर्तव्य होऊन जातें.

युद्ध चालू असतांना नाण्यांची चणचण झाली व चलनी नोटांचा सुकाळ झाला. नोटांचे रुपये मिळण्यास पंचाईत पडून त्यासाठीं बट्टा देण्याची जरूर भासूं लागली. नाण्याच्या बाबतींत सरकारास कडक निर्बंध करावे लागले व हिंदी चलनपद्धति सुयंत्र चालेनाशी झाली. पुढें सरकारनें सॉव्हरिनची किंमत पूर्वी १५ रुपये होती ती बदलून १० रुपये कायद्यानें केली. परंतु आजमितीसहि

साव्हरिनची बाजारांत १७ रुपये किंमत आहे. अशा रीतीनें हिंदी चलनपद्धतीची घडी विसकटून गेली ती सरकारच्या प्रयत्नानेंहि पूर्वस्थितीस आलेली नाहीं, ह्यामुळे सामान्य माणसाचीहि जिज्ञासा प्रदीप्त होणें साहजिकच आहे. चलनाच्या बाबतींत झालेल्या घडामोडीमुळें कित्येक व्यापारी वगैरे लोकांचा तात्कालिक फायदा झाला तर दुसऱ्यांचें पुष्कळ नुकसानहि झालें आहे व परराष्ट्रीय व्यापार जवळ जवळ बंद पडला आहे. तेव्हां ह्या सर्व गोष्टींच्या मुळाशीं काय आहे, हिंदी चलनपद्धति कोणत्या प्रकारची आहे आणि तिची सुधारणा कशी केली पाहिजे ह्या प्रश्नांचीं उत्तरें सामान्य बुद्धीच्या माणसांस समजतील अशा रीतीनें देणें आवश्यक झालें आहे. विषय अवघड आणि गुंतागुंतीचा असल्यानें त्याचें सोप्या भाषेत विवेचन होऊन तें जनतेस सहज उपलब्ध होण्याची विशेष जरूर होती. हें काम माझे तरुण मित्र, रा. खांडेकर ह्यांनीं पुष्कळ परिश्रम घेऊन निव्वळ मराठी भाषा समजणारांसाठीं केलें आहे ह्याबद्दल ते स्तुतीस पात्र असून त्याचें अभिनंदन करणें आवश्यक आहे.

हिंदी चलनपद्धतीची मोडणी आणि तिच्यासंबंधाचे साधकबाधक विचार समजण्यास अगोदर धातूंचीं नाणीं, कागदी चलन, परराष्ट्रांवर व्यापाऱ्यांनीं काढलेल्या हुंड्यांची देवघेव ह्या संबंधाचीं मूलतत्वें नीट समजलीं पाहिजेत. ह्यासाठीं रा. खांडेकरांनीं आपल्या पुस्तकांतील विवेचनाची यथोचित मांडणी केली आहे. युरोपियन राष्ट्रांत झालेल्या चलनात्मक घडामोडींची थोडक्यांत हकीकत सांगून त्यांनीं हिंदी चलनपद्धतीचा संगतवार इतिहास दिला आहे. सदरहू पद्धतीची फांड करतांना पुस्तककर्त्यांनें तिच्यामधील दोषांचें मार्मिक रीतीनें आविष्करण केलें आहे; आणि हिंदी सरकारचें चलनविषयक धोरण सदोष असल्याबद्दलचा भरपूर पुरावा पुढें मांडला आहे. ह्या बाबतींत खुद्द अर्थशास्त्रज्ञांमध्येंच टळक मतभेद आहेत; तथापि गेल्या चारपांच वर्षांच्या अनुभवावरून हिंदी चलनपद्धतीमधला कृत्रिमपणा नाहींसा झाला पाहिजे ह्याविषयीं एकमत झाल्यासारखें दिसत आहे. तें कांहीं असलें, तरी हिंदी लोकांच्या दृष्टीनें ह्या देशांत पाश्चात्य राष्ट्रांच्या चलनपद्धतीसारखी पद्धति स्थापित होण्याची आवश्यकता निर्विवाद सिद्ध झाली आहे.

अर्थशास्त्रांतर्गत विषयांवर मराठी भाषेंत फारच थोडीं पुस्तकें आहेत ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. ही उणीव अल्पांशानें तरी भरून काढण्यास रा. खांडेकरांच्या पुस्तकाचें साहाय्य होण्यासारखें आहे, ह्याबद्दल संशय नाहीं. चलन व हुंडणावळ ह्यांसारख्या गुंतागुंतीच्या प्रश्नांचें सोपपत्तिक रीतीनें मराठी भाषेंत उद्घाटन करणें हें काम सोपें नाहीं. ह्यामुळें प्रस्तुत पुस्तकांत कित्येक स्थळीं दुर्बोधता व भाषेचा ओबडधोबडपणा यांसारखे दोष दिसून आल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. रा. खांडेकरांनीं विषयाचें विवेचन एकंदरीनें चांगलें केलें आहे असेंच वाचकांचें मत होईल, असा आम्हांस भरंवसा वाटतो. योग्य लोकाश्रय मिळाल्यास ह्याच दिशेनें त्यांचे हातून जास्त उपयुक्त कामगिरी होण्यासारखी आहे.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.
२२ जून १९२१

वा. गो. काळे

# आभारप्रदर्शन.

आमच्या विनंतीस मान देऊन ना. प्रो. काळे यांनीं आम्हीं लिहिलेल्या पुस्तकाची हस्तलिखित प्रत वाचून, कांहीं महत्वाच्या मार्मिक सूचना करून व आपला अमूल्य वेळ खर्चून आमच्या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली; व आम्हांस जगासमोर ग्रंथकार म्हणून येण्यास उत्तेजन दिलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत. तसेंच हें पुस्तक लिहिण्याचे कामीं आमचे परममित्र श्रीयुत नारायण सिताराम लिमये, बी. कॉम्. मध्यप्रांतांतील इन्कमटॅक्स एक्झॅमिनर यांचें अतिशय साहाय्य झालेलें आहे; त्यांचे किती आभार मानावे हेंच आम्हांस समजत नाहीं. असो. सरते शेवटीं आमचे तरुण स्नेही श्रीमंत लक्ष्मण नरसिंगराव हेबळीकर ह्यांनीं हा ग्रंथ आपणांस अर्पण करण्यास परवानगी दिल्याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे. हा ग्रंथ वाचून त्यांत कांहीं सूचना करणें झाल्यास वाचकांनीं त्या जरूर कराव्या अशी त्यांना प्रार्थना करून हें आभारप्रदर्शन आम्ही पुरें करितों.

पुणें.
२६-६-२१

शंकर गणेश खांडेकर.

# अनुक्रमणिका.

——:*०*:——

## भाग पहिला.

### नाण्याविषयीं सामान्य विचार.



## भाग दुसरा.

### चलनी नोटांविषयीं सामान्य विचार.



## भाग तिसरा.

### १९व्या शतकांतील चलनपद्धति.

## भाग चवथा.

## विसाव्या शतकाच्या प्रारंभींची चलनपद्धति.



## भाग पांचवा.

## १९०७-१३ पर्यंतची परिस्थिति.



## भाग सहावा.

## युद्धकालीन परिस्थिति.



## भाग सातवा.

## चलनी नोटा.

## भाग आठवा.

### सोन्याचें नाणें.



## भाग नववा.

### स्टेट सेक्रेटरीनें विकावयास काढिलेल्या हुंड्या.



## भाग दहावा.

### युद्धकालीन परिस्थिति.



## भाग अकरावा.

### उपसंहार.



---

# भारतीय चलनपद्धति.

## भाग १ ला.

## चलनपद्धतीचीं मूलतत्त्वें.

### नाण्याविषयीं सामान्य विचार.

उपोद्घातः—हा विषय फार महत्त्वाचा आहे व ह्या विषयाचें सामान्य ज्ञान लोकांस होणें फार अगत्याचें आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, चांगल्या शिकल्यासवरलेल्या लोकांसही ह्या विषयाची फारच थोडी माहिती असते. इतकें गाढ अज्ञान लोकांत असण्याचें असें कारण दिसतें कीं, हा विषय शास्त्रीय आहे व त्यामुळें तो गहन आहे. पण अशी जरी वस्तुस्थिति असली तरी हल्लीं विद्या-प्रसार जास्त झाल्यामुळें लोकांची ज्ञानलालसा वृद्धिंगत होत आहे; व जगांत काय चाललें आहे, वर्तमान कालीं जीं राष्ट्रें अग्रगण्य अशीं मानलीं गेलीं आहेत, त्याचें कारण काय असावें, हें जाणण्याची त्यांची उत्कट मनीषा आहे. अशा वेळीं ह्या चलनपद्धतीचा विचार लोकांपुढें मांडला असतां फायदेशीर होईल अशी आमची खात्री आहे.

हल्लीं हिंदुस्थानची जी विपन्नावस्था आहे तिचीं अनेक कारणें आहेत. ह्या कारणांपैकीं आमच्या मतें एक कारण असें आहे कीं, येथील चलनपद्धति अशास्त्रीय अतएव अनिष्ट आहे. ही 'सुवर्णविनिमयपरिमाणपद्धति' काय आहे, ही अशास्त्रीय कां व कशी आहे ह्याबद्दल सविस्तर विवेचन पुढें येईलच. पण या विवेचनाचें जर समग्र ज्ञान व्हावयाचें असेल तर चलनपद्धतीच्या मूलभूत तत्त्वांची थोडीफार माहिती सामान्य वाचकांस होणें जरूर आहे; म्हणून तशा प्रकारची माहिती आम्ही खालीं देत आहोंत.

**(२) नाण्याची आवश्यकता:**—प्रत्येक देशांत चलनपद्धति ही सरकारच्या धोरणानें प्रचलित झालेली असते. ह्या चलनपद्धतीची आवश्यकता काय आहे असा जर प्रश्न केला तर आपणांस असें उत्तर द्यावें लागेल कीं, सरकारला आपल्या प्रजेकडून दर वर्षी सारा वसूल करावा लागतो. हा सारा किंवा कर एक तर ठराविक नाण्याच्या रूपानें किंवा धान्य वगैरे वस्तूंच्या रूपानें लोक सरकारास देऊं शकतात. पण सरकारास सारा किंवा कर द्यावा लागतो एवढ्याचकरितां कांहीं नाण्याचा जन्म झालेला नाहीं. लोक जेव्हां व्यापार सुरू करतात तेव्हांसुद्धां वस्तूंची किंमत ठरविण्याकरितां विवक्षित नाण्याची आवश्यकता भासूं लागते.

**(३) नाण्याच्या पूर्वेतिहासाबद्दल अरिस्टॉटलची कल्पना व तिजवर चर्चा:**–पण ही किंमत ठरविण्यास विवक्षित किंमतीचें नाणें जरी सोयीचें असलें तरी व्यापार बाल्यावस्थेंत असतांना ही नाण्याची कल्पना अस्तित्वांत नव्हती. पूर्वी लोक वस्तूंनीं वस्तू विकत देत घेत असत. ह्याच पद्धतीला इंग्रजींत 'बार्टर' ही संज्ञा आहे. प्रसिद्ध ग्रीक तत्ववेत्ता आरिस्टॉटल ह्यानें 'राजनीतिशास्त्र' नांवाच्या ग्रंथांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'प्रथम वस्तूंची अदलाबदल वस्तूंनींच होत असे; नंतर वस्तूंची किंमत नाण्याचे रूपांत ठरविण्याची पद्धत सुरू झाली. ज्यावेळीं एका देशांतील लोक स्वतःच्या उपजीविकेकरितां दुसऱ्या देशाच्या लोकांवर अवलंबून राहूं लागले व आपणांस लागणारा माल बाहेरून आणून आपली गरज भागून उरलेला माल बाहेर पाठवूं लागले तेव्हां

अर्थातच पैशाची जरूरी ठळकपणें भासूं लागली; व असा व्यापार करीत असतांना जी वस्तु निसर्गतः महत्त्वाची व व्यवहारांत उपयोगाची असेल तिचा उपयोग करण्याचें त्यांनीं ठरविलें असावें. अशी वस्तू म्हणजे लोखंड, रूपें वगैरे जिन्नस होत. ' कांहीं लोकांचे मतें अरिस्टॉटलचें हें म्हणणें अक्षरशः खरें नाहीं. प्रथम वस्तूंनीं वस्तू विकत देणें घेणें, नंतर वस्तूंची किंमत ठरवितांना द्रव्याचा उपयोग करणें, नंतर पतीवर व्यवहार करणें असा क्रम जो कांहीं लोक देत असतात तो बरोबर नाहीं. कारण व्यवहारांत पैशाचा उपयोग करण्याचें लोकांनीं आपसांत ठराव करून निश्चित केलें असें मानणें चुकीचें होईल. त्याचप्रमाणें वस्तूंची अदलाबदल करण्याची एक पद्धत संपल्यावर दुसरी सुरू झाली, नंतर तिसरी सरू झाली असें म्हणणें इतिहासास सोडून आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, वर सांगितलेले तिन्ही प्रकार मूळ स्वरूपांत प्रथमपासूनच होते व भोंवतालच्या परिस्थितीप्रमाणें ह्या प्रकारांची वाढ आजपर्यंत कमीजास्त झालेली आहे. कसेंही असो. एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, प्रथम वस्तूंची अदलाबदल वस्तूंनींच करण्याची पद्धत जोरांत होती, पण ही पद्धति गैरसोयीची व त्रासाची आहे असें लोकांस कळून येऊं लागलें. एखाद्या मनुष्याजवळ कापड आहे व त्याला धान्य हवें आहे. तें संपादन करण्यास त्यानें असा मनुष्य शोधून काढिला पाहिजे कीं, ज्याच्याजवळ धान्य आहे व ज्याला कापडाची जरूरी आहे. असा मनुष्य सांपडेपर्यंत त्याला थांबावें लागणार. तेव्हां जी वस्तु सर्वांसच महत्त्वाची वाटते व जिच्या मदतीनें वाटेल तो जिन्नस घेतां येईल अशी वस्त जर विनिमयसाधन म्हणून प्रचारांत येईल तर तें सर्वांसच सोयीचें होईल. अशी वस्तु एकदमच कांहीं चांदी किंवा सोनें म्हणून निश्चित झाली नाहीं. प्रथम प्रथम इतर वस्तूंपेक्षां ज्या वस्तूला जास्त मागणी किंवा महत्व असे तीच वस्तू जिनसांची अदलाबदल करण्याचें साधन म्हणून प्रचारांत आली. अशी वस्तु कांहीं एकच नसे. ही वस्तु कधीं व्यवहारांत लागणाऱ्या नित्य वस्तूंपैकीं एक असे, तर कधीं शरीरास विभूषित करणारा दागिना असे. हे दागिने सोन्यारुप्याचेच असत असें नाहीं. मनुष्य ज्या मानानें सुधारलेला असे त्या मानानें कधीं जनावरांचें कातडें तर कधीं कवड्या व

कधीं सोन्यारुप्याचे दागिने असत. पुढें पुढें समाजाची जशी प्रगति झाली त्या॰मानानें पुष्कळ वस्तूंच्याऐवजीं एकच वस्तु प्रचारांत येऊं लागली व ती वस्तु म्हणजे लोखंड, तांबें, चांदी किंवा सोनें अशासारखी एखादी धातु होय. लोकांना अशी धातु आवडण्याचें असें कारण दिसतें कीं, इतर वस्तूंपेक्षां ही धातु सर्वत्र विकतां येते हा तिचा विशेष होय. पुढें पुढें मनुष्याला संसारांत जास्त द्रव्य खर्च करण्याची आवश्यकता भासूं लागली व वस्तूंच्या किंमती वाढत चालल्या, अशा वेळीं सर्वांत जास्त किंमतीची धातु प्रचारांत येऊं लागली, व अशा रीतीनें सोन्याचें महत्त्व प्रस्थापित झालें.

**( ४ ) नाण्याचा आरंभः**—पण आतां असा प्रश्न उपस्थित होतो कीं नाण्याचा आरंभ कसा झाला. वर सांगितलेंच आहे कीं, प्रथम वस्तुविनिमयाचीं साधनें नैसर्गिक पदार्थ असत व हे पदार्थही अनेक असत. पुढें पुढें लोकांना असें वाटूं लागलें कीं, ज्या वस्तूंमुळें जिनसा सारख्या प्रमाणांत विकत घेतां येतात व निरनिराळ्या रकमेपर्यंत त्या जिनसा विकत घेण्याकरितां ज्या वस्तूंचे विभाग करतां येतील त्याच वस्तु प्रचारांत आणलेल्या बऱ्या. अशा वस्तूंचा आकार, परिमाण व रूप जर सारखेंच असेल तरच त्यांचा उपयोग होणार हें उघड आहे. आरंभीं निरनिराळ्या किंमतींच्या जिनसा विकत घेण्याचें कामीं एकाच वस्तूचा उपयोग होणें शक्य नसल्यामुळें निरनिराळ्या वस्तु प्रचारांत आणाव्या लागत. उदाहरणार्थ, एका विशिष्ट किंमतीचा जिन्नस—धान्य किंवा कापड—विकत घेण्याचें कामीं जर एखादा बैल किंवा बकरा उपयोगी पडत असला तर याहून कमी किंमतीच्या जिनसा विकत घेण्याकरितां त्याच बैलाचें किंवा बकऱ्याचें कातडें उपयोगांत आणीत असत. कधीं कधीं निरनिराळ्या दर्जाची एकच वस्तू निरनिराळ्या किंमतीच्या वस्तु विकत घेण्याचें कामीं उपयोगी पडत असे. उदाहरणार्थ, निरनिराळ्या आकारांच्या रंगांच्या कवड्या निरनिराळ्या किंमतीच्या जिनसा विकत घेण्याचें कामीं उपयोगी पडत. पुढें हळूं हळूं एकाच आकाराचीं व निरनिराळ्या किंमतीचीं नाणीं कृत्रिम उपायानें पाडून प्रचारांत आणण्याची चाल सुरू झाली. अशा तऱ्हेनें द्रव्याला समरूपता व अभि-

ज्ञान प्राप्त झाल्यावर त्या द्रव्याचीं निरनिराळीं नाणीं पाडणें सोपें होऊं लागलें. कारण आपण हल्लीं नाणें पाडतों म्हणजे काय करतों ? एखाद्या धातूचा तुकडा घेऊन त्याचे सारख्या आकाराचे आपण लहान लहान तुकडे पाडतों व त्यावर एका ठराविक किंमतीचा छाप मारल्यावर हा तुकडा अमुक किंमतीचा आहे हें अभिज्ञान किंवा ही ओळख आपणांस होऊं लागते.

(५) **नाण्याची वाढ:**—नाण्याची व्याख्या जेव्हान्सनें अशी केलेली आहे:— 'नाणीं हे एक प्रकारचे धातूचे गट्ट होत व त्यांचें वजन व कस हीं त्या धातूच्या वरच्या भागावर काढलेल्या आकृतीच्या खरेपणावरून निश्चित केलीं जातात.' नाण्यावर जी आकृति काढली असते ती जर झिजून गेली नाहीं तर त्या नाण्यांत मूळची शुद्ध धातु व ठरविलेलें वजन कायम आहे, त्यांत इतर धातूची भेसळ केलेली नाहीं व तें नाणें कानसून काढलेलें नाहीं असें खास समजावें. नाण्याची उत्क्रांति कशी झाली हें समजणें फारसें अवघड नाहीं. प्रथम प्रथम ज्या वस्तु जात्याच एका स्वरूपाच्या असत त्यांना विवक्षित आकार, परिमाण व वजन देणें ही पहिली पायरी होय. उदाहरणार्थ, आफ्रिकेंतल्या निग्रोच्या कवड्या, वगैरे जिनसा होत. त्याच युक्तीचा अवलंब एकामागून एक प्रचारांत येणाऱ्या इतर वस्तूंच्या बाबतींत करण्यांत येऊं लागला. ज्यावेळीं वस्तूंची अदलाबदल करण्याचें कामी धातु उपयोगांत येऊं लागली त्यावेळीं तिच्या लहान पाचरी किंवा खिळे किंवा निमुळते लहान आकाराचे स्तंभ बनविण्यांत आले. हल्लींसुद्धां अंतर्राष्ट्रीय व्यापारी देवघेवीच्या वेळीं रोख नाणीं न देतां लगडीच देण्यांत येतात व ह्या लगडी म्हणजे गत कालच्या निमुळत्या स्तंभाचे निदर्शकच होत असें म्हटलें पाहिजे. व्यापारी लोक नाण्याचेऐवजीं लगडी जास्त पसंत करतात, ह्याचें कारण असें असावें कीं, अवघर्षणानें नाणीं जशीं झिजतात तशा ह्या लगडी झिजत नाहींत. नाण्याचा आकार सामान्यपणें वाटोळा असतो अशी आपली दृढ समजूत आहे; पण कधीं कधीं नाणीं चतुष्कोणी, षट्कोणी, अष्टकोणी, व चंद्र कोरीच्या आकाराचीं सांपडतात. पण अगोदर हीं नाणीं वर्तुळाकृती कशीं झालीं हें निश्चित सांगतां येत

नाहीं. पण ही आकृति प्रचारांत आल्यावर लोकांच्या मनांत धातूची वाटोळी तबकडी करून तिजवर ओर्के पाडणें ही कल्पना आली असावी; व एकदा अशा तऱ्हेचीं नाणीं सुरू झाल्यावर त्यांवर खुणेकरतां कांहीं आकृति काढावी म्हणजे लबाडी होणार नाहीं ही कल्पना सहजच सुचली असेल. पूर्वी नाण्याच्या एकाच बाजूला छाप उठवला जाई; पण पुढें पुढें असा अनुभव येऊं लागला कीं, दुसऱ्या बाजूवर कांहीं आकृति नसल्यामुळें लुच्चे लोकांना त्या नाण्यांतील कांहीं धातू काढून घेतां येऊं लागली. ही लबाडी थांबावी ह्मणून नाण्याच्या दोन्ही बाजूंवर आकृति उठविण्याचा प्रचार सुरू झाला व नाण्याच्या कांठावर कंगोरेही पाडण्यांत येऊं लागले. अशा रीतीनें हल्लीं प्रचारांत असलेल्या नाण्याची वाढ झालेली आहे.

(६) **नाण्यांत असलेली धातुः**—निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या धातूंचीं नाणीं बनविण्यांत आलेलीं आहेत. लोखंड, तांबें, शिसें, कथिल, प्लॅटिनम, रुपें व सोनें ह्या सर्व धातूंचा उपयोग करण्यांत आलेला आहे. कोणत्या वेळीं कोणत्या धातूची निवड होत असे हें त्या वेळीं असलेल्या वस्तूंच्या किमतीवर व लोकांच्या उत्पन्नावर अवलंबून असे. पण आपण असा एक सामान्य नियम लक्षांत ठेविला पाहिजे कीं, लोकांची पैसे मिळविण्याची व खर्च करण्याची शक्ति व रहाणी जशी जास्त प्रमाणांत वाढते तशी जास्त किमतीच्या नाण्याची जरूरी लोकांस भासत असते.

हल्लीं जगांत असलेलीं प्रचलित नाणीं जर आपण पाहिलीं तर चांदी व सोनें ह्या दोन धातूंचाच नाणें पाडण्याचें कामीं उपयोग होत असतो. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, हल्लीं सुधारलेल्या देशांत कागदी नोटा, मग त्या सरकारनें काढिलेल्या असोत किंवा पेढ्यांनीं काढिलेल्या असोत, व्यापारांत देवघेवीच्या कामीं उपयोगांत आणलेल्या असतात व त्यामुळें सोन्यारुप्याची पूर्वीइतकी जरूरी राहिली नाहीं. तरीपण वस्तुविनियमसाधन ह्या नात्यानें ह्या सोन्यारुप्याची गरज केव्हांही भासणारच. निव्वळ कागदी घोडे नाचवून व्यापाराची प्रचंड उलाढाल जर कोणी करूं ह्मणेल तर व्यापारी आणीबाणीचे वेळीं हा कागदी डोलारा ढांसळून पडल्यावांचून राहणार नाहीं. कांहीं लोकांचें असें ह्मणणें

आहे कीं, सुधारलेल्या देशांत आयात मालाची किंमत निर्गत मालाच्या किंमतीनें परस्पर फिटून जाते व इंग्लंडसारख्या देशांत तर बहुतेक व्यवहार पतीवर व कागदी नोटांवरच चालतो. ह्या सर्व गोष्टी सामान्यपणें खऱ्या आहेत; पण त्या सोन्याच्या आधारावरच चालतात हें आपण विसरतां कामा नये. इंग्लंडमध्यें लोकांची पूर्ण खात्री असते कीं, आपण आपल्या नोटा 'बँक ऑफ् इंग्लंड' मध्यें घेऊन गेलों तर आपणांस नोटांचेऐवजीं सोनें खास मिळेल व ह्याच विश्वासावर लोक आपलें काम नोटांवर भागवितात. लोकांचा हा विश्वास कांहीं कारणांमुळें जर उडाला, तर ते नोटा फेंकून देऊन सोनें जवळ ठेऊन आपला व्यवहार सोन्यानेंच करतील ह्यांत शंका नाहीं.

(७) **सोन्याचांदीचें महत्त्वः**—आतां प्रश्न असा उद्भवतो कीं, फार प्राचीन काळापासून सोनें व चांदी ह्यांनांच महत्व कां आलें आहे ? सोन्याचांदीला एवढें महत्व येण्याचीं अनेक कारणें आहेत. पहिलें कारण असें दिसतें कीं, लोकांना ह्या दोन धातूंच्या योगानें आपलें शरीर सुशोभित करण्याची हौस पुरवून घेतां येत असे. आपला असा अनुभव आहे कीं, ज्या वस्तूंच्या योगानें मनुष्यास डामडौल करतां येतो त्या वस्तूंना नेहमीं मागणी असते; व अशा वस्तु जर विनियमाचीं साधनें होऊन बसलीं तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कांहीं एक कारण नाहीं. दुसरें कारण असें आहे कीं, ह्या धातु गंज वगैरे चढून कधींही कमी होत नाहींत. तिसरें कारण असें आहे कीं, ह्या धातु लोकांच्या गरजांना पुरून उरणाऱ्या असून पुनः त्या साधारणपणें दुर्मिळ आहेत; कारण त्या थोड्या प्रमाणांत व बऱ्याच खर्चानें प्राप्त होणाऱ्या आहेत. चवथें कारण असें दिसतें कीं, ह्या धातूंना पुष्कळ वर्षांच्या रूढीनें महत्त्व आलेलें आहे. सर्वांनाच ह्या दोन धातु हव्या आहेत व त्यांचा प्रसार फार प्राचीन काळापासून चालू असल्यामुळें त्यांना साहजिकच महत्त्व आलेलें आहे, व ह्या महत्वामुळें त्यांची किंमतही आजपर्यंत टिकलेली आहे व ज्या माणसाजवळ किंवा राष्ट्राजवळ ह्या धातु जास्त प्रमाणांत असतात त्या माणसाचा व त्या राष्ट्रांचा दर्जा राजकीय दृष्ट्या श्रेष्ठ मानला गेला आहे. त्यांतल्यात्यांत चांदीपेक्षां सोनें जास्त मौल्यवान् असल्यामुळें बहुतेक सुधारलेल्या

देशांत सोन्याचाच उपयोग नाणीं पाडण्याचे कामीं होत असतो व थोड्या किंमतींचीं नाणीं पाडण्याकडे चांदीचा उपयोग करण्यांत येतो. ज्या देशांत सोन्याचें नाणें असून सर्व वस्तूंची किंमत सोन्यानें ठरविली जाते त्या देशाला आपली आर्थिक उन्नति करून घेतां येते असा युरोप खंडांतल्या राष्ट्रांचा अनुभव आहे. तेव्हां हिंदुस्थानचे लोक ह्या देशांत सोन्याचीं नाणीं सर्रास सुरू करा असें कां ह्मणतात तें आतां वाचकांस समजेल.

(८) **चांगल्या नाण्याला लागणारे आवश्यक गुणः**—कोठलेंही नाणें जर लोकप्रिय व्हावयाचें असेल व त्याला ' चांगलें नाणें ' अशी जर संज्ञा द्यावयाची असेल तर खालीं सांगितलेले गुण त्या नाण्यांत असले पाहिजेतः—

(१) नाण्याच्या वजनांत व घटनेंत पूर्ण सारखेपणा असणें. ही गोष्ट फार जरूरीची आहे. नाणें तयार करितांना तें पुष्कळ दिवस टिकावें म्हणून सोन्याच्या किंवा चांदीच्या धातूंत थोडें तांबें मिसळण्याची चाल आहे; पण ही तांब्याची धातु प्रत्येक सोन्यारूप्याच्या नाण्यांत ठराविक प्रमाणांतच मिसळली पाहिजे व सर्व नाणीं सारख्या किंमतीचीं बनविलीं पाहिजेत. ज्यावेळीं नाणें पाडण्याच्या कलेंत पूर्ण वाढ झालेली नव्हती अशा वेळीं नाणीं सारख्याच किंमतीचीं पाडलीं जात नसत.

तसेंच नाण्याचें वजनही कमीजास्त असतां कामा नये. व्यवहारांत ही गोष्ट सर्वांशानीं अमलांत आणणें शक्य नाहीं. तरीपण शक्य तितकी काळजी ह्या बाबतींत घेतली पाहिजे. ज्या देशांत नाणें पाडलें असेल त्या देशांत त्याचा व्यवहार नुसता मोजून होतो. कारण त्या नाण्याची कायद्यानें ठरविलेली किंमत लोकांस मान्य असते. मी जर एकाद्या दुकानांत गेलों व १० रुपयांचें कापड खरेदी केलें तर दुकानदार नुसते रुपये मोजून घेईल व त्या रुपयांवर जर सरकारी शिक्का असला तर तीं नाणीं तोलून पाहण्याच्या भानगडींत तो पडणार नाहीं; पण परदेशी व्यापाऱ्याला जर मला रुपये द्यावयाचे असतील तर तो त्या रुपयांचें वजन करून जितकी चांदी त्या रुपयांत असेल त्या चांदीच्या किंमतीचा माल देईल. ह्या कारणास्तव नाण्याचें वजन बिनचूक असणें अवश्य आहे.

( २ ) दुसरी गोष्ट म्हणजे नाण्याचा आकार व वजन हीं सोयीचीं पाहिजेत. नाण्याचा मुख्य हेतू असा आहे कीं, तें लोकांच्या हातांत नेहमीं खेळलें पाहिजे. हा हेतु जर साध्य व्हावयाचा असेल तर त्याचा आकार व वजन हीं बेताचीं व सोयीचीं पाहिजेत.

( ३ ) चांगलें नाणें असें असलें पाहिजे कीं, इतर लोकांना बनावट रीतीनें तें पाडतां येऊं नये. ही गोष्ट जर साध्य व्हावयाची असेल तर नाण्यावर जी आकृति उठवावयाची, तिचें अनुकरण इतरांस करतां येऊं नये व तसें अनुकरण जो करूं लागेल त्याला तें त्रासाचें व खर्चाचें वाटलें पाहिजे. हल्लीं नाणीं पाडण्यास लागणाऱ्या यंत्रामध्यें इतकी सुधारणा झाली आहे कीं, बनावट नाणीं पाडणें बहुतेक अशक्यच होऊन बसलें आहे.

( ४ ) शेवटली गोष्ट म्हणजे नाणीं टिकावूं असून तीं चटकन ओळखतां आलीं पाहिजेत. प्रत्येक नाणें इतकें टणक व चिवट असावें कीं, तें नेहमीं वापरण्यांत आल्यामुळें तें झिजूं नये; त्याचप्रमाणें तें इतकें ठोकून वाढवितां यावें कीं, त्यावर छाप सहज उठवितां यावा. नाणें टिकावूं करण्यास सोपी युक्ती अशी आहे कीं, त्या नाण्याच्या भोंवतालचा काठ त्याच्या पृष्ठ भागापेक्षां किंचित उंच असावा म्हणजे नाणें फारसें झिजत नाहीं.

**९. नाणें कोणी पाडावें:**—हल्लीं नाणें पाडण्याचा अधिकार असणें हें राजसत्तेचें चिन्ह मानलें गेलें आहे; अतएव प्रत्येक राष्ट्रांत तेथील सरकारच हा अधिकार आपल्या हातांत ठेवीत असते. पण असा एक काळ होता कीं, त्या काळांत खाजगी व्यक्तींकडे हा अधिकार सोंपविलेला असे. आपणांस ठाऊक आहे कीं, पेशवाईत नाणें पाडण्याचा अधिकार कांहीं ठराविक लोकांकडे असे; पण अशा पद्धतीचा दुष्परिणाम काय होतो हें श्रीमंत नानासाहेब पेशवे ह्यांस कळून चुकल्यावर त्यानीं टांकसाळीची व्यवस्था आपल्या हातांत घेतली. युरोपखंडातही हा अनुभव आल्यामुळें सरकार आपल्या हातांत हा नाणें पाडण्याचा अधिकार ठेवीत असतें. पूर्वी इंग्लंडांत पेढयांना आपल्या नोटांचा प्रसार करण्याची मुभा

असें; पण अशा नोटा फाजील प्रमाणांत काढून त्यांपासून नफा मिळवावयाची प्रवृत्ति ह्या पेढ्यांची दिसून आल्यामुळें फक्त बँक आफ् इंग्लंडलाच कांहीं विवक्षित अटींवर नोटा काढण्याचा अधिकार तेथील सरकारनें दिलेला आहे. नाणीं पाडण्याचा अधिकार खाजगी व्यक्तींना दिला असतां पहिली मुख्य अडचण अशी उत्पन्न होते कीं, सामान्य माणसांना वजन, कस वगैरे बाबतींत खरीं नाणीं कोणतीं, खोटी नाणीं कोणतीं ह्याचा निर्णय करणें कठीण पडतें. कारण प्रत्येक नाणें पाडणारा गृहस्थ आपल्या इच्छेप्रमाणें नाण्यावर छाप व आकृति उठविणार व जर एखाद्या लुच्चा सराफानें खोटीं नाणीं पाडण्यास सुरुवात केली तर खऱ्या खोट्या नाण्यांची सरभेसळ होऊन अज्ञ व गरीब माणसांचें नाहक नुकसान होणार. अशा दृष्टीनें विचार केला असतां खाजगी व्यक्तीकडे नाणें पाडण्याचा अधिकार न सोंपवितां सरकारनेंच हें काम अंगावर घेणें फार फायदेशीर आहे. नाणीं पाडण्यापासून होणारा फायदा हा लोकांकडूनच जर व्हावयाचा तर तो सर्व लोकांसच परत मिळाला पाहिजे; कांहीं ठराविक व्यक्तींना मिळणें न्याय्य होणार नाहीं. हल्लीं चोहोंकडे लोकसत्तेचा वारा वाहत आहे व लोकसत्ता व सरकार हीं जेव्हां एकजीव असतात तेव्हां हा फायदा सरकारला मिळाला म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें लोकांसच परत मिळत असतो; पण हिंदुस्तानांत सरकार व हिंदी जनता त्यांचें तादात्म्य न झाल्यामुळें रुपयासारखें कृत्रिम नाणें सुरूं करून सरकार दर रुपयामागें जो ६ आणे नफा मिळवितें त्याचा फायदा येथील लोकांस मिळत नाहीं; तर हा नफा सुवर्णगंगाजळी रूपानें विलायतेंत ठेवला गेल्या कारणानें तेथील व्यापाऱ्यांना त्याचा फार फायदा होत आहे; कारण त्यांना स्वस्त व्याजानें ही गंगाजळीठेवींतली रक्कम वापरावयास मिळत आहे.

(१०) **नाणीं पाडून घेण्याकरतां लागणारा खर्चः**—प्रत्येक देशांत सरकार आपल्या सोयीकरतां किंवा आपल्या प्रजेच्या सोयीकरतां धातूंच्या लगडींपासून नाणीं पाडीत असतें. सरकार ज्यावेळीं आपल्या सोयीकरितां नाणीं पाडीत असतें तेव्हां ह्या खर्चाचा प्रश्न उद्भवत नाहीं; पण ज्यावेळीं

खाजगी कामाकरितां लोक आपल्या लगडी घेऊन नाणीं पाडून घेण्याकरितां टांकसाळींत जातात त्यावेळीं हीं नाणीं पाडून देण्याबद्दल सरकारनें कांहीं फी त्यांच्याकडून घ्यावी किंवा काय असा प्रश्न उद्भवतो. कांहीं लोकांच्या मतानें नाणीं पाडण्याबद्दल भाडें आकारणें वावगें होणार नाहीं. कारण टांकसाळींत पाडून तयार झालेलें नाणें हें कच्च्या मालापासून बनलेल्या पक्क्या मालाप्रमाणेंच असतें व कच्चा माल पक्का बनविण्याबद्दल जर आपण एखाद्या व्यापाऱ्याला थोडी जास्त किंमत देतों तर नाणें पाडण्याबद्दल सरकारास भाडें देण्यास आपण कां कुरकुरावें ? शिवाय सरकारनें असें भाडें आकारलें म्हणजे नाणें देशाच्या बाहेर फारसें जाणार नाहीं; कारण बाहेरचे व्यापारी ह्या भाड्याचा खर्च सोसण्याचें नाकारून नुसत्या सोन्याचांदीच्या लगडी घेण्यास तयार होतील व नाणें आपोआपच देशांतल्या देशांत राहील. इतकेंच नव्हें तर नाणीं आटून नाहींशीं होण्याचा संभव कमी होईल; कारण एखाद्या इसमानें जवाहिराच्या व्यापाऱ्याकडे नाणीं आटविण्याकरतां नेलीं असतांना तो व्यापारी नाणीं पाडण्यास लागणारा खर्च सोसण्यास तयार होणार नाहीं व नाणीं आणणारा इसम अशीच इच्छा करणार कीं, आपण एकदां सोसलेला खर्च ह्या व्यापाऱ्याकडून मिळालाच पाहिजे. ह्याचा असा परिणाम होईल कीं, नाणीं आटविण्याबद्दल कोणाचीच इच्छा होणार नाहीं.

ह्याच्या उलट दुसऱ्या लोकांचें असें म्हणणें आहे कीं, नाणीं मोफत पाडून द्यावींत म्हणजे परदेशचे व्यापारी सुद्धां हीं नाणीं वापरूं लागतील व त्यामुळें स्वदेशाच्या व्यापाराला अनायासें उत्तेजन मिळेल. दुसरें असें कीं, मोफत नाणीं पाडल्यानें ज्या वेळीं कांहीं कारणानें किंमतींत फरक होऊं लागतो व त्यामुळें पैशाची जरूरी कमी भासूं लागते अशा वेळीं नवीन बदललेल्या किंमतीशीं ह्या नाण्यांचा पुनः लवकर जम बसतो. नाणें पाडण्याबद्दल थोडें भाडें आकारल्यानें, नाणीं बाहेर जाण्यानें होणारें नुकसान, तीं नाणीं बाहेर न गेल्यामुळें, होत नाहीं ह्या म्हणण्यांतही फारसा अर्थ नाहीं. कारण हें नुकसान मुळांतच फारसें होत नाहीं. कारण जीं नाणीं बाहेर जातात त्यांपैकीं बरींच

नाणीं देशांत परत येतात. शिवाय असे कांहीं प्रसंग व्यापारांत येतात कीं, त्यावेळीं सोन्याचांदीच्या लगडीं उपलब्ध नसल्यामुळें नाणीं पाठवावींच लागतात. अशा वेळीं व्यापारी लोक स्वतः नुकसान न सोसतां देशांत आणलेल्या मालावर थोडी किंमत चढवून गिऱ्हाइकांकडून तें नुकसान भरून काढतील हें उघड आहे.

अशा तऱ्हेची दोन पक्षांची ह्या विषयासंबंधानें विचारसरणी आहे. एकंदरींत विचार करतां असें दिसतें कीं, नाणीं पाडण्यास जो प्रत्यक्ष खर्च लागतो तेवढाच सरकारनें लोकांकडून त्यांचीं नाणीं पाडण्याबद्दल घ्यावा. त्याहून जास्त पैसे घेणें म्हणजे धातूंच्या लगडी घेऊन येणाऱ्या माणसाचें नाहक नुकसान करणें आहे; इतकेंच नव्हे तर लोकांची विनाकारण फसवणूक होऊन हीणकस नाण्यापासून होणारे तोटे दिसूं लागतात.

(११) **विनिमयचलनः**—( Medium of Exchange ) पूर्वी ज्यावेळीं वस्तूंनीं वस्तूंची खरेदीविक्री करण्याची पद्धती होती त्यावेळीं व्यापाराची एवढी वाढ झालेली नव्हती; पण व्यापारांत ज्यावेळीं पैशाचा उपयोग करण्यांत येऊं लागला तेव्हां समाजांत मोठीच क्रांती घडून आली. पूर्वी जमीनदार व त्यांचीं कुळें, किंवा राजे व त्यांचे ठेवलेले नोकर—मग ते नोकर लष्करी खात्यांत काम करीत असोत किंवा इतर खात्यांत काम करीत असोत-त्यांचे संबंध पूर्वापर रूढीनेंच ठरलेले असत व हे संबंध जवळ जवळ गुलामगिरीचेच असत; पण ज्यावेळीं कामावर ठेवलेल्या माणसास पैशाच्या रूपानें वेतन देण्याचा प्रघात सुरू झाला तेव्हां सेव्य व सेवक ह्यांच्या परस्परसंबंधांत विलक्षण स्थित्यंतर घडून आलें व त्या संबंधांना ठरावाचें रूप प्राप्त झालें. अशा प्रकारचें स्वरूप प्राप्त झाल्यावर समाजाची कशी प्रगति झाली हें सांगण्याचें हें स्थळ नव्हे; पण एवढेंच येथें सांगितलें असतां पुरें होईल कीं, सामाजिक व राजकीय स्वातंत्र्य ह्या बदललेल्या परिस्थितीमुळें लोकांस मिळून एकंदर मानवजातीचा पुष्कळ फायदा झाला. असा फायदा होण्याचीं अनेक कारणें आहेत. वस्तूंची अदलाबदल करण्याकरितां पैशाचा उपयोग होऊं लागला म्हणजे ही अदलाबदल फार सुलभ

रीतीनें होऊं लागते व तशी ती सुरू झाली म्हणजे श्रमविभागाचें तत्त्व जारीनें अंमलांत येऊं लागतें व हें तत्त्व प्रचारांत येऊं लागलें म्हणजे उद्योगधंद्याची वाढ होऊन प्रत्येक माणसाला आपल्या योग्यतेप्रमाणें व इच्छेप्रमाणें धंद्याची निवड करून स्वतःची उन्नति करून घेतां येते.

( १२ ) **पैशाचे उपयोगः**—पैशाचे अनेक उपयोग आहेत. त्यांपैकीं मुख्य उपयोग म्हणजे पैशामुळें वस्तूंची अदलाबदल सुलभ रीतीनें करतां येते हा होय. कांहीं लोकांची अशी कल्पना आहे कीं, पैशाची प्रत्यक्ष मदत वस्तुविनिमयाचे कामीं फारच थोडी होते, कारण हल्लींच्या विसाव्या शतकांतल्या व्यापारी युगांत सुद्धां जिनसांची अदलाबदल जिनसांनींच होत असते, व एखाद्या देशाचा जर आपण व्यापार घेतला तर त्या देशचे व्यापारी परदेशी व्यापाऱ्यांना रोख पैसे न देतां ते आपापसांत मालांची नुसती अदलाबदल करीत असतात. ही कल्पना सर्वांशांनीं खरी नाहीं. हल्लींच्या औद्योगिक काळांत पैशाचा उपयोग न करण्याचें मनांत आणलें तर हल्लीं प्रचलित असलेला श्रमविभाग अशक्य होऊन बसेल. मालाची अदलाबदल करणें ही साधी गोष्ट नव्हे. ज्यावेळीं एखादा व्यापारी आपला माल विकतो त्यावेळीं तो गिऱ्हाईकाकडून रोख पैसे घेऊन आपल्याला हवा तो माल दुसऱ्या व्यापाऱ्याकडून घेत असतो. अशा दृष्टीनें विचार केला असतां व्यापारी देवघेवींत पैशाच्या उपयोगाकडे दुर्लक्ष्य करणें चुकीचें होईल. नुसत्या वस्तूंच्या साटेलोट्यानेंच जगांतील व्यापार चालतो हें म्हणणें खोटें आहे.

पण पैसा म्हणजे रोख नाणें किंवा नाणेंवाचक एकादी हुंडी किंवा बँक नोट असा अर्थ आमच्या म्हणण्याचा नाहीं. आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं, मालाची खरेदी व विक्री होत असतांना त्यांची किंमत पैशांत व्यक्त झालीच पाहिजे व मालाची अदलाबदल होत असतांना जर एकाद्या व्यापाऱ्यानें दुसऱ्या व्यापाऱ्याकडून कमी किंमतीचा माल विकून जास्त किंमतीचा माल विकत घेतला तर त्याला वजाबाकी करून जादा किंमतीबद्दल रोकड द्यावी लागेल.

ह्या उपयोगाशीं पूर्ण तादात्म्य असलेला असा दुसरा उपयोग म्हटला म्हणजे पैशामुळें वस्तूंच्या किंमती निश्चित करतां येतात व किंमती ठर-

विण्याचें एक ठराविक प्रमाण आपणांस मिळतें. इंग्लंडमध्यें असलेला साव्हरिन, अमेरिकेंतील डॉलर हीं ह्या प्रमाणाचीं उदाहरणें होत; व ह्या देशांत सर्व वस्तूंच्या किंमती ह्या ठराविक प्रमाणांत निश्चित केल्या जातात. प्रत्येक वेळीं किंमत देतं असतांना ह्या ठराविक प्रमाणाचाच उपयोग करण्याची जरूरी नाहीं. एखाद्या वस्तूंची किंमत १० साव्हरिन आहे असे ठरल्यावर ह्या साव्हरिनऐवजीं तितक्याच किमतीचीं इतर धातूंचीं नाणीं किंवा कागदी नोटा दिल्या तरी चालतात.

ह्याशिवाय इतर उपयोग म्हटले म्हणजे हें प्रमाण एकदां निश्चित झाल्यावर वस्तुंची किंमत तावडतोब न देतां कालांतरानें देण्याचें साधन म्हणून पैसा उपयोगी पडतो व पुष्कळ काळपर्यंत पैशाचा संग्रह करतां येतो. कापड, धान्य वगैरे वस्तु कालांतरानें कुजतात, सडतात व नाश पावतात; पण सोनें, चांदी, तांबें ह्या धातू अशा आहेत कीं, त्यांचें वर्णन 'नैवं दहति पावकः। न चैनं क्लेदन्त्यापो न शोषयति मारुतः'॥ ह्या भगवद्गीतेच्या शब्दांत करतां येईल. ह्यांशिवाय पैशाचे इतरही उपयोग आहेत; पण ते विशेष महत्वाचे नसल्यानें त्यांचा उल्लेख करण्याची जरूर नाहीं.

असो. वर सांगितलेल्या मुख्य उपयोगांपैकीं सर्वांत मुख्य उपयोग म्हणजे पैशानें वस्तूंची अदलाबदल सुलभ होते हा होय. विनियमसाधन म्हणून पैशाचा लोकांत जो प्रसार होतो त्याचीं अनेक कारणें आहेत. पण मुख्य कारण हें आहे कीं, ह्या पैशा विनियमचलन (Circulating Medium of Exchange) ह्या नात्यानें नाणें, नोटा वगैरे जे अनेक प्रकार आहेत ते लोक मान्य करतील असा सर्वांचा भरंवसा असतो. लोकांना ही जी खात्री वाटते त्याचीं हीं अनेक कारणें आहेत. लोकांना असें वाटतें कीं, समाजांत सोन्याचांदीला त्यांच्या नैसर्गिक मूल्यामुळें केव्हांही मागणी असणार व लोक त्यांचा स्वीकार करणार. एवढेंच नव्हे तर ह्या धातु जवळ बाळगण्याची हांव सर्वांनाच असणार. तेव्हां अशा धातूंचीं नाणीं जर समाजांत प्रचलित असलीं तर त्यांचा स्वीकार सर्वत्र होईल असा लोकांचा भरंवसा असतो. दुसरें असें कीं, अशा प्रकारचीं नाणीं जें सरकार सुरू करतें तें सरकार भरभक्कम पायावर प्रस्था-

पित झाल्यामुळें एखाद्या माणसानें कर्जफेड होत असतांना जर हीं स्वीकारण्याचें नाकारलें तर तें सरकार कायद्याच्या जोरावर त्या माणसास तीं नाणीं स्वीकारण्यास भाग पाडील. ह्या दोन कारणांशिवाय लोकांचा ह्या नाण्यांच्या स्वीकाराबद्दल जो भरंवसा असतो त्याचीं आणखीही कारणें आहेत. बँक नोटा, हुंड्या, रेल्वे डिबेंचर ह्यांसारखे चलनी नाण्याचे प्रकार, ज्या संस्था लोकांत प्रचलित करतात त्या संस्थांवर लोकांचा विश्वास असतो म्हणूनच त्यांचा प्रचार होत असतो.

( १३ ) **विनियम चलनाचे प्रकारः**—ह्याचे स्थूल मानानें दोन वर्ग करतां येतील. एका वर्गांत सर्वत्र प्रसार असलेलें चलन घालतां येतील. ह्यांमध्यें धातूचीं नाणीं, ज्या नोटांना नाणीं मिळत नाहींत अशा नोटा व ज्याबद्दल नाणीं मिळतात अशाही नोटा वगैरे समाविष्ट होतात. दुसऱ्या वर्गांत मर्यादित प्रसार असलेले चलन असतात. उदाहरणार्थ, पेढ्यांवर दिलेल्या हुंड्या किंवा चेक ( ह्या हुंड्या बँकेंत ठेवलेल्या अनामत रकमेबद्दल पावत्या असतात ) एका व्यापाऱ्यानें माल पाठविल्यावर दुसऱ्या व्यापाऱ्यावर काढिलेल्या हुंड्या, व जिन्नस गहाण ठेवल्याबद्दल दिलेले तारण रोखे व म्युनिसिपॉलिट्या, रेलवे कंपन्या सारख्यांनीं काढिलेले कर्ज रोखे हे सर्व मर्यादित असलेल्या चलनाचे प्रकार होत. त्यांचा प्रचार मर्यादित असण्याचें कारण असें आहे कीं, त्या सरकारानें सुरू केलेल्या नसतात.

वर सांगितलेल्या विनियमचलनाच्या प्रकारांवरून वाचकांच्या लक्षांत ही गोष्ट आलीच असेल कीं, चलनी नाण्यांचा प्रश्न वाटतो तितका साधा नाहीं. आपण असें पाहतों कीं, बहुतेक देशांत नाणीं निरनिराळ्या धातूंचीं व नांवांचीं असून हीं नाणीं, चलनी नोटा व निव्वळ खाजगी लोकांच्या, किंवा अर्धवट किंवा पूर्ण सार्वजनिक स्वरूपाच्या संस्थांच्या पतीवर काढल्या गेलेल्या हुंड्या, रेलवे डिबेंचर वगैरे हीं सर्व एकसमयावच्छेदेकरून समाजांत प्रचलित असतात. कधीं कधीं आपण असें ऐकतों कीं, समाजांत एकच वस्तुचे चलन असतें. फार प्राचीन काळीं ग्रीस संस्थानांमध्यें तांब्याचें किंवा लोखंडाचें असें एकच नाणें

प्रचारांत होतें. हल्लींसुद्धां कांहीं देशांत अतिशय किंमत उतरलेल्या नोटा ह्याच प्रचलित असल्या म्हणजे त्या देशांत ह्या कागदी नोटा व्यतिरिक्त इतर कोठल्याही धातूचें नाणें प्रचारांत राहूं शकत नाहीं. पण एक गोष्ट मात्र आपण विसरतां कामा नये. ती ही कीं, हल्लीं प्रत्येक देशांत एकाच प्रकारच्या नाण्यानें लोकांचें काम भागणार नाहीं. ज्या लोकांना मोठ्या किंमतीच्या रकमा व्यापारांत किंवा इतरत्र द्यावयाच्या असतात त्या लोकांच्या सोयीकरतां साव्हरिन किंवा १०, २५, ५० रुपये किंमतीच्या नोटा सरकारनें प्रचारांत आणल्या पाहिजेत. अशा लोकांना एक रुपाया किंवा पावल्या, अधेल्या सारखीं नाणीं सोयीचीं होणार नाहींत; पण ज्या लोकांचें उत्पन्न बेताबाताचेंच असतें त्या लोकांच्या सोयीकरतां चांदीचीं नाणींच सुरू करणें इष्ट असतें. त्याचप्रमाणें कोठल्याही सरकारनें निव्वळ कागदी नोटा काढून त्याचा प्रचार आपल्या देशांत करूं नये. तेव्हां एकंदर तात्पर्य हें आहे कीं, प्रत्येक देशांत एक सोन्याचें नाणें मुख्य नाणें म्हणून प्रचलित असावें; व वस्तूंची किंमत ह्या सोन्याचे नाण्यानें ठरविण्यांत यावी. हें सोन्याचें नाणें लोकांच्या सांपत्तिक स्थितीला अनुरूप असें असावें. हिंदुस्थासारख्या देशांत इंग्लिश साव्हरिनसारखें मोठ्या किमतीचें नाणें सुरूं न करतां १० रुपये किंमतीचें सोन्याचें नाणें सुरू होणें श्रेयस्कर आहे. ह्या सोन्याच्या नाण्यांना पोषक अशीं इतर धातूंचीं नाणीं पाडण्यांत यावींत व त्यांचा संबंध सोन्याच्या नाण्याशीं असून तीं मुख्य नाण्याचे विभाग असावींत.

**( १४ ) धातूच्या नाण्याच्या चलन पद्धतीचेप्रकारः—** पहिल्यानें कोणत्या चलनपद्धतीस प्रारंभ झाला असावा ह्याचा जर आपण विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, सोनें, चांदी ह्यांसारख्या मूल्यवान धातु इतर व्यापारी मालाप्रमाणेंच वजन केल्या गेल्यावर चलन म्हणून वापरल्या जात. सरकार जरी हल्लीं ठराविक आकाराचीं, वजनाचीं व कसाचीं नाणीं पाडीत असतें तरी लोक सरकारावर सर्वस्वीं भिस्त न ठेवतां स्वतः नाण्यांचा कस व वजन हीं जोखून बघत असतात. नाण्यांचें वजन करून मग तीं प्रचारांत आणण्याची पद्धत अजूनही परराष्ट्रीय व्यापाऱ्यांना पैसे देण्याचेवेळीं दिसून येते.

ह्यानंतरचा दुसरा प्रकार म्हटला म्हणजे एकधातुचलनपद्धतीचा होय. ह्या प्रकारांत एकाच धातूचा नाणीं पाडण्याचे कामीं उपयोग होत असतो; मग हें नाणें सोनें असो किंवा चांदी असो. आतां प्रश्न असा येतो कीं, हल्लींच्या सुधारलेल्या देशांत लोकांचें काम एकच धातूच्या नाण्यांनीं भागेल किंवा कसें? एखाद्या देशांतल्या लोकांची रहाणी जर साधी असेल व त्यांचें उत्पन्नही बेताबाताचें असून त्या लोकांचा परदेशच्या व्यापाऱ्यांबरोबर मोठ्या प्रमाणांत व्यापार चालत नसेल तर त्या देशांत एकच धातूच्या नाण्यानें काम भागेल. तरीपण हें नाणें जर सोन्याचें असेल तर त्या लोकांची फारच गैरसोय होईल. कारण सोन्याचें नाणें किरकोळ व लहान प्रमाणांत असलेल्या व्यवहारांत उपयोगी पडत नाहीं; पण अशीं राष्ट्रें हल्लीं फारशीं अस्तित्वांत नाहींत. आगगाड्या, तारायंत्रें वगैरे साधनांनीं जगांतील सर्व देश परस्परांशीं निगडित झालेले आहेत व व्यापारही प्रत्येक राष्ट्राचा वाढत्या प्रमाणावर आहे. तेव्हां तात्विकदृष्ट्या विचार केला तर सोन्याचें नाणें व चांदीचें नाणें मोठ्या प्रमाणांत पैशाचे व्यवहार करण्याकरितां व चांदीचें नाणें व किरकोळ व्यवहाराकरतां सुरू केलेलें असावें.

तिसरा प्रकार म्हणजे द्वि किंवा बहुचलनपद्धतीचा होय. आपण येथें ह्या द्विचलनपद्धतीचाच विचार करूं. ह्या पद्धतीचा विशेष असा आहे कीं, पैशाचे व्यवहार होत असतांना सोनें व चांदी ह्यांचा दर्जा समानच राहिला पाहिजे. ही स्थिति जर प्राप्त व्हावयाची असेल तर पहिली गोष्ट ही असली पाहिजे कीं, लोकांनीं सोन्याचांदीच्या लगडी टांकसाळींत आणल्या असतांना त्यांचीं नाणीं सरकारनें अमर्याद प्रमाणांत पाडून दिलीं पाहिजेत. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, वाटेल त्या माणसानें चांदी टांकसाळींत नेऊन तिचे मोबदला सोन्याचीं नाणीं घेऊन जावींत किंवा सोनें चांदी घेऊन येणाऱ्या माणसाला मोफत नाणीं पाडून मिळावींत. 'अमर्याद प्रमाणांत' असें ह्मणण्याचा आमचा हेतु इतकाच आहे कीं, दोन्ही नाणीं मुख्य नाणीं म्हणून मानण्यांत यावींत. एक नाणें मुख्य व दुसरें कृत्रिम असें मानण्यांत येऊं नये. तसेंच एखाद्या ऋणकोला आपलें कर्ज फेडतांना त्याच्या इच्छेप्रमाणें वाटेल त्या प्रमाणांत व वाटेल

तितक्या रकमेपर्यंत दोन्हांपैकीं कोठल्याही नाण्यानें पैसे चुकते करण्याची मुभा असावी व सरकार-सारा द्यावयाचे प्रसंगीं त्याला वाटेल त्या धातूच्या (सोनें किंवा चांदी ह्यांपैकीं) नाण्यानें देण्याची परवानगी असावी. अशी परवानगी सरकार जेव्हां देत असतें तेव्हां सोनें व चांदी ह्यांच्या नाण्यांत प्रमाण काय असावें हें त्यानें ठरविलें पाहिजे व हें प्रमाण सोन्याचांदीच्या बाजारांत ह्या दोन धातूंच्या किमतींत असलेल्या प्रमाणाबरहुकुम पाहिजे. ह्या दोन प्रमाणांत जर फरक पडूं लागला तर अर्थात् ग्रेशॅमनें शोधून काढिलेला नियम अमलांत येऊन ज्या धातूची किंमत उतरली असेल त्या धातूच्या नाण्यानेंच लोक सरकारांस पैसे देऊं लागतील व ज्या धातूची किंमत वाढली असेल किंवा पूर्वीप्रमाणेंच कायम असेल त्या धातूचीं नाणीं लोक सांठवूं लागतील; किंवा परदेशच्या व्यापाऱ्यांना हीं नाणीं देऊन टाकतील.

कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, सरकारनें सोनें व चांदी ह्या दोन धातूंच्या नाण्यांस यें ठरविलेलें प्रमाण व ह्या दोन धातूंमधील बाजारांत असलेल्या किंमतीचें प्रमाण ह्यांत फरक पडण्याचा फार संभव आहे कारण ह्या दोन धातु कांहीं नेहमीच सारख्या प्रमाणांत उत्पन्न होत नाहींत व त्यांची लोकांकडून होणारी मागणाही व्यापारी परिस्थिति वारंवार बदलत असल्यामुळें सारखी होत नाहीं तेव्हां सरकारनें ठरविलेलें प्रमाण कायम कसें रहावें? उलटपक्षीं दुसऱ्या लोकांचें असें म्हणणें आहे कीं, ह्या वर सांगितलेल्या दोन प्रमाणांत जर थोडाबहुत फरक पडूं लागला तर अशा वेळीं ज्या देशांत द्विचलन-पद्धति आहे त्या देशांत सोनें व चांदी भरपूर असल्यास हा फरक लवकरच नाहींसा होईल; कारण सोनें व चांदी हीं दोन्ही मुख्य चलन मानल्यामुळें ह्या दोन धातूंत एकमेकांना सावरून धरण्याची शक्ती येते. उदाहरणार्थ, ज्या ठिकाणीं ही द्विचलनपद्धति प्रचारांत नाहीं अशा ठिकाणीं चांदी जास्त झाल्या-मुळें ही पद्धति प्रचारांत असलेल्या देशांत चांदीचा भाव जर उतरूं लागला व अशा रीतीनें सरकारनें ठरविलेला चांदीचा दर व बाजारांतला चांदीचा दर ह्यांमध्यें फरक पडूं लागला तर ग्रेशॅमच्या नियमाप्रमाणें सोन्याचा दर वाढून

ल्याचा प्रचार कमी होऊन त्याचा उपयोग चांदी खरेदी करण्याकडे होऊं लागेल. पण ह्याच वेळीं चांदीला जास्त मागणी आल्यामुळें तिचा भाव सोन्याच्या मानानें चढूं लागेल व सोन्याचा पुरवठा चांदी खरेदीकरतां म्हणून एकदम वढल्यामुळें चांदीच्या मानानें त्या सोन्याची किंमत उतरूं लागेल. अशा रीतीनें परस्परांना सांवरून धरण्याची शक्ती ह्या दोन धातूंत असल्यामुळें सरकारनें ठरविलेला दर व बाजारांतील दर ह्यांमध्यें फारसा फरक पडणार नाहीं. मात्र एक गोष्ट आपण गृहीत धरली पाहिजे. ती ही कीं, ही द्विचलनपद्धति पुष्कळ देशांत असून ह्या दोन्ही धातु पुष्कळ प्रमाणांत प्रचारांत असल्या पाहिजेत. ह्यावरून एक गोष्ट वाचकांस कळलीच असेल कीं, द्विचलनपद्धति एकाच देशांत चालणें शक्य नाहीं. असो. ह्या विषयाचा पुनः एकदा आपणास विचार करावा लागणार असल्यामुळें हा विषय येथेंच आटपतां घेतों.

चवथा प्रकार म्हटला म्हणजे संमिश्र चलनपद्धतीचा होय. ह्या प्रकाराचा विशेष असा आहे कीं, ह्यामध्यें एकच धातु नाणें पाडण्याचे कामीं उपयोगांत आणली जाऊन त्या धातूचें नाणें अमर्याद प्रमाणांत कायदेशीर चलन म्हणून मानण्यांत येतें, व सोयीकरतां म्हणून इतर धातूंचीं नाणीं पाडण्यांत येऊन देवघेवीच्या वेळीं मर्यादित प्रमाणांत त्यांचा स्वीकार करण्यांत येतो. हल्लीं इंग्लंडांत जी पद्धति आहे ती ह्या प्रकाराचें निदर्शक आहे. हिंदुस्थानांतही रुपया हें मुख्य नाणें मानलेलें असून तांबें, निकल ह्या धातूंच्या नाण्यांचा मर्यादित प्रमाणांत लोक स्वीकार करीत असतात.

(१५) **ग्रेशॅमनें शोधून काढलेला नियमः**—आतांपर्यंत आपण धातूंच्या नाण्याच्या चलनपद्धतीचा विचार केला. आतां कागदी नोटांच्या चलनपद्धतीचा विचार करावयाचा; पण हा विचार करण्यापूर्वीं एका मुद्याचा विचार करणें अवश्य आहे. वर एक दोन ठिकाणीं ग्रेशॅमच्या नियमाचा उल्लेख आलेला आहे. हा नियम काय आहे व तो कितपत सत्याला धरून आहे ह्याचा विचार करून मग कागदी नोटांच्या चलनपद्धतीकडे वळूं. ह्या नियमाला ग्रेशामचा नियम अशी संज्ञा आहे; कारण हा नियम प्रथम ग्रेशामनें इंग्ला-

बेथराणीच्या कारकीर्दींत शोधून काढला असें मॅकलिआडचें म्हणणें आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, ग्रेशामला हा मान विनाकारण दिला जात आहे. त्याचें कारण असें कीं, ग्रेशामच्या पूर्वी कितीतरी वर्षें हा नियम ग्रीक लोकांना अरिस्टोफेन्सच्या वेळेपासून ठाऊक होता. असो. ग्रेशामचें म्हणणें असें कीं, 'हीणकस नाणें चांगल्या नाण्याला प्रचारांतून हांकून देतें.' एकाच नांवाचीं नाणीं जर वजनांत व कसांत सारखीं नसलीं तर त्यांपैकीं जीं नाणीं सरस असतील तीं जवळ ठेवून लोक हीणकस नाण्यांवरच काम भागवतील व सरस नाणीं एकतर आटविलीं जातील व त्यांतून जी धातु निघेल तिचा उपयोग दागिनें, भांडीं वगैरे जिनसा करण्याकडे होईल; अथवा हीं नाणीं परदेशच्या व्यापाऱ्यांना देण्याकरतां देशाबाहेर पाठविलीं जातील. ह्याचा एकंदर परिणाम असा होईल कीं, चांगली नाणीं अदृश्य होऊन हीणकस नाण्यांचाच जास्त प्रसार होऊं लागेल. ज्या वेळीं चांगलीं व हीणकस नाणीं एकाच धातूचीं असतात त्या वेळीं हा नियम लागू पडतो असेंच केवळ नाहीं, तर एकाच वेळीं जर सोनें व चांदी किंवा सोनें व चांदी नोटा प्रचारांत असतील व त्यांपैकीं एका धातूची किंमत उतरली असेल तर ती धातु दुसऱ्या धातूच्या नाण्यांना हुसकाऊन देईल व तीं नाणीं अदृश्य होतील. हा नियम न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणें त्रिकालाबाधित नहीं पहिली गोष्ट अशी कीं, हा नियम कांहीं विवक्षित प्रसंगीं लागूचर होत असतो; त्याचप्रमाणें ह्या नियमाला नियम हें नांव कितपत शोभेल हा प्रश्नच आहे. कारण अशा तऱ्हेनें चांगल्या नाण्याला वाईट नाण्यानें हुसकाऊन देणें ही फार तर प्रवृत्ति ह्मणतां येईल. कारण प्रत्येक वेळीं हटकून चांगलीं नाणीं अदृश्य होतात असें ह्मणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, ज्या वेळीं देशांत पदार्थांच्या किंमती वाढत असतात; व असतील तेवढ्या नाण्यांची-मग तीं नाणीं हीणकस असोत किंवा चांगलीं असोत-लोकांना जरूर असते, त्या वेळीं हें नाणें चांगलें आहे किंवा हीणकस आहे हें लोक पहात बसत नाहींत. त्यांच्या हातांत आलेलें नाणें इतर लोक स्वीकारतात किंवा नाहीं हें ते पहात असतात. विशेषतः दुकानदार लोक व सावकार ह्यांना प्रत्येक नाणें जोखून घेण्याला सवडच नसते. ज्या वेळीं पैशाचा व्यापार करणाऱ्या लोकांना एकाच नांवाच्या

नाण्यांपैकीं कांहीं नाणीं हिणकस झालीं आहेत असें आढळून येतें तेव्हां तें तीं नाणीं प्रचारांत ठेवून चांगलीं नाणीं आटवण्याकरितां ह्मणा किंवा परदेशीं पाठविण्याकरितां ह्मणा, जवळ ठेवूं लागतात. व एकदां हलक्या वजनाचीं नाणीं सरकारनें ठरविलेल्या दरानें स्वीकारण्याची अडचण दिसूं लागली म्हणजे ही ग्रेशामनें सांगितलेली प्रवृत्ति दिसून येते. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य ज्या वेळीं देशांत चांगलीं व वाईट मिळून असलेलीं नाणीं लोकांना लागणाऱ्या नाण्यांपेक्षां जास्त असतात तेव्हांच हा ग्रेशामचा नियम खरा ठरतो.

दुसरें असें कीं, एकाच वेळीं चांगलीं व वाईट नाणीं प्रचारांत असतांना लोकमताविरुद्ध किंवा प्रचलित रूढीविरुद्ध, ग्रेशाम म्हणतो त्याप्रमाणें, चांगलें नाणें अदृश्य होऊन वाईट नाणें प्रचारांत येईल ही गोष्ट शक्यच नाहीं. असो. ही परिस्थिति लक्षांत घेतली तर ग्रेशामनें सांगितलेल्या नियमांत थोडी सुधारणा केली पाहिजे. ती अशी कीं, ह्या ग्रेशामच्या विधानाला नियम ही संज्ञा न देतां सापेक्ष तत्व किंवा प्रवृत्ति हें नांव द्यावें व तें तत्त्व खालील भाषेंत व्यक्त करावें. 'एखाद्या देशांत एकापेक्षां अधिक धातूचीं नाणीं (कधीं कधीं एक धातू व कागदी नोटा) प्रचारांत असतील व त्यांपैकीं एका धातूचें (किंवा कागदी नोटा) नाणें ह्याचा उपयोग वस्तूंची अदलाबदल करण्यापेक्षां दुसऱ्या कामांत जर जास्त होत असेल तर हिणकस झालेलें नाणें, लोकांच्या गरजांपेक्षां हीं हिणकस व चांगलीं नाणीं जास्त झालीं असल्यास चांगल्या नाण्याला हुसकाऊन देईल; मात्र लोकमत किंवा रूढि ह्या हिणकस नाण्याच्या प्रचाराच्या विरुद्ध असलें पाहिजे.'



# भाग दुसरा.

—:-×०×-:—

## चलनी नोटाविषयीं सामान्य विचार.

( १६ ) आतांपर्यंत आपण धातूंपासून बनलेल्या नाण्यासंबंधानें विचार केला. त्यावरून वाचकांची अशी खात्री होईल कीं, लोकांनीं एखादी वस्तू चलन म्हणून स्वीकारावयाची तर त्या वस्तूमध्यें कांहीं विवक्षित गुण पाहिजेत. अर्थशास्त्रज्ञांच्या मतें नाण्याकरितां जी वस्तु निवडावयाची तिजमध्यें खालीं दिलेले गुण असले पाहिजेतः—

( अ ) त्या वस्तुमध्यें अंगभूतच मोल पाहिजे. सोनें, चांदी ह्या धातूंमध्यें असें मोल असल्यानें इतर वस्तूंची किंमत ह्या धातूंना ठरवितां येते.

( आ ) त्या वस्तूची अदलाबदल वाटेल त्या प्रमाणांत करितां आली पाहिजे व वाटेल त्या रकमेपर्यंत लोकांना देण्याघेण्याचें कामीं तां उपयोगी पडली पाहिजे. ह्या गोष्टी जर साध्य व्हावयाच्या असतील तर त्या वस्तूचे भाग पाडतां आले पाहिजेत व ती समजातीय पाहिजे; एवढेंच नव्हे तर त्या वस्तूचे पडणारे भाग पुनः एकत्र केले तर त्याची किंमत कमी जास्त होतां कामा नये. उदाहरणार्थ, आपण एक हिरा घेऊं. ह्या हिऱ्याचे आपण जर दोन भाग केले तर ह्या दोन भागांचें वजन जरी सबंध हिऱ्याएवढें असलें तरी ह्या दोन भागांची किंमत सबंध हिऱ्याच्या किंमतीहून खास कमी भरेल; अतएव हिरा हा पदार्थ चलनाचे कामीं उपयोगी नाहीं. ह्याशिवाय चलनयोग्य वस्तूला लागणारे गुण म्हटले म्हणजे त्या वस्तूची किंमत सामान्यपणें स्थिर असावी, ती वस्तु पुष्कळ काळ टिकाऊ असावी, ठोकून वाढवितां येणारी असावी व ती चटकन् ओळखतां यावी.

हे सर्व गुण एकत्र केले असतां आपणांस असें दिसून येईल कीं, एवंगुण-विशिष्ट अशी वस्तु सांपडणें विरळा; पण ह्यांपैकीं बरेच गुण ज्या वस्तूंत सांपडतील अशी वस्तू सोनें किंवा चांदी ही धातु होय; पण ह्या गुणांपैकीं एकही गुण कागदांत सांपडणें शक्य नाहीं. असें असून कागदाचा उपयोग चलनाचे कामीं होतो हें ऐकून पुष्कळांस आश्चर्य वाटेल; परंतु जरा खोल विचार केला असतां हें आपलें आश्चर्य टिकणार नाहीं. कारण नाण्याचा मुख्य उपयोग काय? नाणें म्हणजे जगांत असलेल्या संपत्तीच्या कांहीं भागावर, कांहीं अटींवर, हक्क सांगण्यास मिळलेलें एक प्रकारचें अधिकारपत्र आहे. हें अधिकारपत्र जर धातूच्या नाण्यानें देतां येतें तर एखाद्या कागदाच्या चिठोऱ्यानेंही तें कां देतां येऊं नये? नीट विचार केला असतां कांहीं बाबतींत एखाद्या धातूपेक्षां कागदच चलन म्हणून जास्त सोयीचा असतो असें आपणांस कळून येईल. कारण तो हलका व स्वस्त असल्यामुळें त्याचा प्रसार फार जलद होतो. ह्याचमुळें हल्लीं सुधारलेल्या राष्ट्रांत कागदी चलनपद्धति मोठ्या प्रमाणांत चालू आहे.

(१७) **पूर्वेतिहास:**—चलनाचे कामीं कागदाचा उपयोग करतां येतो ही कल्पना प्रथम पूर्वेकडील देशांत उद्भवली. १२ व्या शतकांत ज्या वेळीं मार्को पोलोनें चीन देशाला भेट दिली त्यावेळीं तेथील लोक तुतीच्या झाडाच्या आंतील सालीचे तुकडे पाडून त्यांचा उपयोग नाणीं म्हणून करीत असत असें त्याला आढळून आलें. ह्या तुकड्यांना जणूं काय ते सोन्याचांदीच्या धातूंचेच तुकडे आहेत असें समजून लोक मान देत असत. तेराव्या शतकांत इराणच्या राजांपैकीं एका राजानें चीनचें अनुकरण करून आपल्या देशांत कागदी नोटा सुरू करण्याचा प्रयत्न केला व ह्या नोटांवर, त्या इराणी नाहींत नव्हेत म्हणून कांहीं आकृत्या व नांवेंही त्यानें उठविलीं. पण लोकमताचा पाठिंबा न मिळाल्यामुळें त्या राजाचा हा बेत फसून चोहोंकडे बंडें झालीं, सरकारी अधिकाऱ्यांचे खून झाले, दुकानें बंद झालीं व नाणीं अदृश्य झालीं. ह्यानंतर १४ व्या शतकांत जपानमध्यें ह्या कागदी नोटा प्रसार करण्याचे प्रयत्न झाले. ह्या कागदाशिवाय पशायरस, झाडांच्या साली, कातडीं वगैरे जिन्नसही चलनाचें साधन म्हणून

वापरण्यांत येत असत. असो. अगदीं अर्वाचीन काळीं सुधारलेल्या युरोपखंडांत ह्या कागदी नोटांचा फायदा सरकार व लोक ह्यांना समजूं लागला; व हल्लीं ह्या नोटा प्रचलित करण्याच्या बाबतींत विलक्षण क्रान्ती पाश्चिमात्य देशांत घडून आलेली आहे.

(१८) **कागदी नोटांचे प्रकारः**--हे तीन प्रकार आहेत. एखाद्या पेढीजवळ किंवा सरकाराजवळ आपण कांहीं रुपये ठेवतों व हे रुपये अनामत ठेवल्याबद्दल आपणांस त्या पेढीकडून पावती मिळते. ही पावती हा एक नोटांचा प्रकार होय. एखादा इसम, एखादी सार्वजनिक किंवा अर्धवट सार्वजनिक संस्था किंवा सरकार नोटा काढीत असतें; व ह्या नोटा त्या इसमाकडे किंवा संस्थेकडे किंवा सरकारकडे परत आणून दिल्यावर तावडतोब त्या नोटावर दिलेली रकम **नाण्याच्या रुपानें** लोकांस मिळते. ह्या नोटा हा दुसरा प्रकार होय. नाण्याच्या रूपानें हा शब्द महत्वाचा आहे. कारण जर ह्या नाण्याचे-ऐवजीं जमीन किंवा दुसरा माल तो इसम किंवा ती संस्था किंवा तें सरकार देऊं लागेल तर ह्या नोटा ह्या दुसऱ्या प्रकारामध्यें येऊं शकत नाहींत. आणी-बाणीचे वेळीं सामान्य माणसें किंवा व्यापारी लोक ह्यांना रोख नाण्यांचा जितका उपयोग होतो तितका उपयोग जमिनीपासून त्यांना होत नाहीं. ज्या वेळीं सरकार १०० रुपये किंमतीच्या, ५०० रुपये किंमतीच्या अशा नोटा काढीत असतें व ह्या नोटा खजिन्यांत आणून दिल्या असतांना त्याबद्दल रोख रुपये देण्यास बांधून घेत नाहीं, त्यावेळीं नोटांचा तिसरा प्रकार दिसून येतो. अशा नोटा सरकारालाच काढतां येतात असें नव्हें. तर पेढ्यांनाही त्या प्रचलित करतां येतात व त्यांचें दिवाळें निघालें म्हणजे त्यांनीं काढिलेल्या नोटांबद्दल रोख रुपये मिळणें अशक्य होऊन बसतें. आतां असा प्रश्न उद्भवतो कीं, ज्या नोटांबद्दल नाणीं देण्यास सरकार बांधलेलें नाहीं त्या नोटा लोक काय म्हणून स्वीकारतात? ह्याचें उत्तर असें आहे कीं, सरकार जर सोटेशाही असलें व तें लोकमतास धाब्यावर बसविण्याइतकें लष्करी सामर्थ्यामुळें प्रबळ असलं तर लोकांना इच्छे-विरुद्ध ह्या नोटांचा स्वीकार करावा लागतो. दुसरें असें कीं, नाणें हें वस्तूंच्या

अदलाबदलीचें साधन म्हणून त्याची किंमत आहे. हें नाणें चांगलें असो किंवा कृत्रिम असो, त्याचा जर देण्याघेण्याचे कामीं राजीखुषीनें लोक उपयोग करीत असले तर नुसत्या कागदी नोटा थोड्या प्रमाणांत सरकारनें काढल्या असतील तर त्यांची फारशी कुरकुर नसते.

## (१९) ज्या नोटांबद्दल नाणीं मिळत नाहींत अशा नोटांपासून होणारे फायदे व तोटे:—

कागदी नोटांच एक मुख्य फायदा असा आहे कीं, त्या सुरू केल्या असतां सोन्याचांदीची गरज विनिमयसाधन म्हणून फारशी रहात नाहीं. सोनें व चांदी खाणींतून बाहेर काढणें फार खर्चाचें काम असतें म्हणून त्या सोन्याचांदीची गरज जर कागदासारख्या स्वस्त वस्तूंनीं भागविली तर बरीच मेहनत व बराच खर्च वांचेल हें उघड आहे; व ही मेहनत व हा खर्च इतर द्रव्योत्पादक धंद्याकडे लावून देशाची संपत्ति वाढवितां येईल. पण हा फायदा जर आपणांस करून घेण्याचा असेल तर एक गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, सर्वच राष्ट्रांनीं एकसमयावच्छेदेकरून एकच कागदी नोटांचें नाणें सर्वत्र सुरू करण्याचा ठराव करावा व त्या नोटा जास्त प्रमाणांत काढावयाच्या नाहींत व काढल्याच तर वाढत्या लोकसंख्येच्या मानानें जरूर लागतील तेवढ्याच अगोदर ठरवून ठेवलेल्या प्रमाणांत काढवयाच्या असा निश्चय जाहीर करावा.

कागदी नोटांचा दुसरा फायदा असा आहे कीं, विनिमयसाधन म्हणून नाणीं वापरलीं गेल्यामुळें तीं झिजून त्यांचें जें वजन कमी होतें व जें अगणित नुकसान निष्कारण होतें तें नुकसान कागदी नोटा काढल्या असतां सहज टळेल. त्याशिवाय इतरही फायदे त्या कागदी नोटांपासून होतात. कागदी नोटा नाण्यापेक्षां वापरण्यास सोयीच्या असतात. १०० रुपये जवळ बाळगण्यापेक्षां तितक्याच रुपयांची एक नोट बाळगणें किंवा बाहेर गांवीं दुसऱ्यास पाठविणें जास्त सोयीचें असतें; इतकेंच नव्हे तर तें कमी खर्चाचें असतें. पण त्या फायद्यांपेक्षां सर्वांत मोठा

फायदा सरकारास होत असतो. एखाद्या युद्धप्रसंगीं किंवा कांहीं कारणांमुळें आंतरराष्ट्रीय व्यवहारांत सरकारची पत उतरली म्हणजे सरकारास कर्ज काढणें फार कठीण जातें. अशा वेळीं ह्या नोटा लोकांना विश्वासांत घेऊन व योग्य प्रमाणांत जर काढण्यांत आल्या तर सरकारला बाहेर कर्ज काढण्याची जरूर पडत नाहीं.

पण कागदी नोटा सर्वस्वीं धातूच्या नाण्याशीं कधींही बरोबरी करूं शकत नाहींत. कागदी नोटा काढतांना त्यांना जर सोन्याचांदीचा आधार असेल तरच त्या लोकप्रिय होतात. सरकारनें दंडुकेशाही करून लोकांवर नोटा लादल्या तर लोक कांहीं वेळ स्वस्थ बसतील; पण कांहीं काळानें ह्या नोटांची किंमत कमी होऊन त्यांची प्रतिष्ठा राहणार नाहीं. ह्या कागदी नोटांत मुख्य दोष असा आहे कीं, सोन्याचांदीच्या मानानें त्यांची किंमत केव्हांही अस्थिरच राहणार; शिवाय सोनें व चांदी ह्या धातूंचें महत्त्व सर्व राष्ट्रांत सारखें आहे, व ह्या धातूंचीं नाणीं तीं जर कृत्रिम नसतील तर, सर्व राष्ट्रांत चालूं शकतात; पण कागदी नोटांचें कार्यक्षेत्र ज्या देशांत तेथील सरकारनें त्या काढल्या असतील त्या देशांतच मर्यादित असणार.

पण ह्यापेक्षां कागदी नोटांमध्यें असलेला सर्वांत मोठा दोष म्हटला म्हणजे हा कीं, त्या काढण्यांत सरकारास काय किंवा पेढ्यांस काय फारसा खर्च येत नसल्यामुळें व ज्या नोटा काढावयाच्या त्याबद्दल नाणें देण्याची सक्ती नसल्यामुळें त्या वाजवीहून जास्त प्रमाणांत काढण्याचा मोह सरकारास व पेढ्यांस आवरत नाहीं, व गरीब लोकांचें नाहक नुकसान होतें. ज्या देशांत पूर्ण धातुचें नाणें प्रचारांत आहे अशा देशांत नोटांचा प्रसार करण्यास सरकारनें आरंभ केला म्हणजे पहिला परिणाम असा होतो कीं, ग्रेशामच्या नियमाचा प्रभाव दिसूं लागतो व नाणीं अदृश्य होऊं लागतात. मात्र एक गोष्ट आपण गृहीत धरली पाहिजे कीं, लोकांना ह्या चलनी नोटांची व्यापार वगैरे करितां जरूरी नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें लोकांना जर खरोखर जरूरी असेल तर ह्या नोटा धातूच्या नाण्याच्या मानानें हीणकस असल्या तरी धातूचा

नाणीं अदृश्य होणार नाहींत. अशा रीतीनें नाणीं अदृश्य होऊं लागून अशी एक वेळ प्राप्त होईल कीं, त्या वेळीं देशांत नुसत्या चलनी नोटाच राहतील. अशी परिस्थिति प्राप्त झाली असतांना सरकारनें जास्त नोटा प्रचारांत आणण्याचा जर प्रयत्न केला तर मात्र लोकांचें खरेंखुरें नुकसान होऊं लागतें. कागदी नोटांना बाहेर कुत्रामुद्धां विचारीत नाहीं. नोटांच्या किंमती उतरूं लागल्यामुळें पूर्वीचे ऋणको व धनको ह्यांमध्यें झालेले करार डळमळूं लागतात व पुढें होणारे करार कोणी करूं इच्छित नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या नोटांची किंमत कमी झाल्यामुळें व्यापारी वर्गाला व नोकरीस ठेवणारे गिरण्यांचे मालक ह्यांना गरीब मजुरांना चांगलेंच नागवितां येतें; कारण नोटांच्या किंमती उतरल्यामुळें पूर्वी ज्या मालाला १०० रुपये पडत असत त्या मालावर ते उतरलेल्या किंमतीइतकी जास्त किंमत आकारणार व मजुरांस मात्र पूर्वीचाच ठराविक पगार देणार; व जरी मजूरांच्या आग्रहामुळें त्यांना जास्त पगार द्यावा लागला तरी आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ज्या मानानें जिनसांच्या किंमती वाढून व्यापाऱ्यांना व धंदेवाल्यांना फायदा होतो तितक्या मानानें मजुरांची मजूरी वाढून त्यांना फायदा होत नाहीं. मजुरांप्रमाणेंच ज्यांचे पगार ठराविक असतात अशा मध्यम वर्गांतील लोकांचें फार नुकसान होतें असा आपला हिंदुस्थानच्या लोकांचा अनुभव आहे; व येथें जरी नोटा फाजील प्रमाणांत काढण्यांत येत नसल्या तरी रुपयासारखीं कृत्रिम नाणीं पाडण्याचा अधिकार सर्वस्वीं लोकमताची बिलकूल छाप नसलेल्या सरकारचे हातीं असल्यामुळें व असे रुपये पाडणें हें सरकारास फायद्याची बाब असल्यामुळें (कारण एका रुपयामागें सरकारास ६ आणे तरी नफा होत असतो व तो फायदा विलायतेमध्यें गंगाजळीरूपानें ठेवण्यांत येतो.) हे रुपये लोकांच्या गरजांपेक्षां जास्त प्रमाणांत पाडले गेले आहेत व येथें ही भयंकर महागाई झाली आहे. त्यामुळें व्यापारी वर्गाचें उखळ पांढरें झालें आहे व मजूरवर्ग व मध्यमस्थितींतील लोक ह्यांचे हाल होत आहेत.

ह्याशिवाय ह्या कागदी नोटांच्या किंमती उतरल्यानें अनेक तोटे होतात. नोटा जर १ रुपयासारख्या लहान किमतीच्या असल्या तर समाजां-

तल्या कनिष्ठ वर्गाचें अतोनात नुकसान होतें. राष्ट्राची व व्यक्तीची पत नाहींशी होऊन खोट्या नोटा पाडण्यासारख्या गुन्ह्यांकडे त्याची प्रवृत्ति होते; व सर्वांत मोठें नुकसान म्हणजे वस्तूंच्या किंमतींत स्थिरता नसल्यामुळें सट्टेबाजीला ऊत येऊं लागतो व उद्योगधंदे बुडूं लागतात.

पण आतां असा प्रश्न उद्भवतो कीं, कागदी नोटा फाजील प्रमाणांत काढल्या गेल्या आहेत हें समजावयाचें कसें? एखाद्या सरकारला योग्य प्रमाणांत नोटा काढण्याची जरूर वाटली व तशा नोटा काढीत असतांना आपण फाजील प्रमाणांत नोटा काढूं लागलों आहोत हें सरकारनें कसें ओळखावें? सुदैवानें अशी परिस्थिति ओळखण्यास कांहीं अनुकूल साधनें आहेत. कागदी नोटा वाजवीपेक्षा जास्त प्रमाणांत काढल्या गेल्या आहेत हें ओळखण्याची पहिली खूण अशी आहे कीं, त्या नोटांची किंमत व्यवहारांत उतरूं लागते व सोन्याचांदीची किंमत अधिक होऊं लागते. कारण पेढीवाले लोक व इतर व्यापारी परदेशीं पाठविण्यास सोनें चांदी जमवूं लागतात व प्रसंगविशेषीं जास्त किंमत देऊं लागतात.

दुसरी खूण अशी कीं, ग्रेशामच्या नियमाला अनुसरून धातूचीं नाणीं अदृश्य होऊं लागतात. हा अनुभव सार्वत्रिक आहे. ज्या ज्या ठिकाणीं नोटांचा फाजील प्रमाणांत सुकाळ होऊं लागतो त्या त्या ठिकाणीं सोन्याचांदीच्या खाणी असलेल्या दक्षिण अमेरिकेंतसुद्धां नाण्यांची पळापळ सुरू होते.

तिसरी खूण अशी कीं, परदेशांवर काढलेल्या हुंड्याचा भाव चढूं लागतो. आपला असा अनुभव आहे, कीं, ज्या हुंड्याची किंमत परदेशांत मिळावयाची असते त्या हुंड्या कांहीं ठराविक हुंडणावळीच्या दरानें सोन्याचांदींत विकल्या जातात, किंवा खरेदी केल्या जातात. हा व्यवहार सर्व सुधारलेल्या देशांत व्यापाराच्या मुख्य मुख्य शहरीं नेहमीं चाललेला असतो. आतां अशी कल्पना करूं कीं, त्या देशांत चलनी नोटा बोकाळल्या आहेत व त्यांची किंमत उतरलेली आहे. विलायतेच्या व्यापाऱ्यानें येथें कांहीं माल खरेदी केल्यावर येथील व्यापाऱ्यानें जर त्या विलायतेच्या व्यापाऱ्यावर हुंडी काढली तर त्या हुंडीबद्दल सोनें

मिळणार असल्यामुळें त्या हुंडीचा भाव अर्थातच चढूं लागेल. शेवटली खूण म्हणजे मालाच्या किंमती वाढूं लागतात. नोटांची किंमत जर फार उतरली नसेल तर ह्या किंमती वाढणार नाहींत; पण ही किंमत जर शेंकडा १० ह्या प्रमाणांत उतरूं लागली तर व्यापारी वर्ग व माल उत्पन्न करणारे लोक हटकून किंमती वाढवितील. एवढेंच नव्हे तर एकदा किंमती चढल्यावर त्या उतरूं नयेत म्हणून ते अटोकाट प्रयत्न करतील व सरकारनें जर ह्या कागदी नोटा प्रचारांतून नाहींशा करण्याचा निश्चय केला तर हेच व्यापारी त्या सरकारला विरोध करतील.

(२०) ज्या नोटांबद्दल मोबदला नाणीं मिळतात अशा चलनी नोटा:—आतांपर्यंत ज्या नोटांबद्दल मोबदला नाणीं मिळत नाहींत अशा नोटांबद्दल आपण विचार केला. पण आपण आतां दुसऱ्या प्रकारच्या नोटांबद्दल विवेचन करूं. ह्या नोटांचा हा विशेष आहे कीं, जा कोणी ह्या नोटा प्रचारांत आणील त्याच्यावर त्या नोटा परत आल्या असतां त्या आणून देणाऱ्याला रोख नाणें देण्याची जबाबदारी आहे. ह्या निर्बंधाचा असा फायदा होतो कीं, मागें सांगितलेले चलनी नोटांचे दोष टळून त्यांचे फायदे मात्र आपणांस मिळतात. हे फायदे काय आहेत ह्यांचें वर्णन एकदां आलेलेंच आहे. त्यामुळें द्विरुक्तीचा दोष आम्ही घेत नाहीं.

ह्या नोटा देशांतील पेढयांना किंवा सरकारला काढितां येतात. आपणांला सरकारच्या धोरणाशीं विशेष कर्तव्य असल्यामुळें आपण पेढयांनीं काढलेल्या नोटांचा विचार बाजूस ठेवूं. सरकार ज्यावेळें अशा नोटा काढीत असतें त्यावेळीं तें ह्या नोटांच्या किंमतीचें सोनेंचांदी बाजूला काढून ठेवीत असतें किंवा कधीं कधीं नोटांच्या किंमतीइतकी रकम बाजूला काढून न ठेवतां कांहीं थोडी रकम अलग काढून ह्या नोटांचा प्रसार आपल्या पतीवरच करीत असतें; पण लोकांची मात्र अशी खात्री असते कीं, आपण जर आपल्या नोटा खजिन्यांत घेऊन गेलों तर त्या नोटामोबदला आपणांस रोख नाणें खास मिळेल. सरकारचीही अशी खात्री असते कीं, आपली पत असल्यामुळें सगळेच लोक एकाच वेळीं आपल्या नोटा घेऊन रोख रकमेची मागणी करणार नाहींत.

सरकारवर नोटा घेऊन येणारास रोख नाणें देण्याची जबाबदारी असल्यामुळें ह्या नोटा नियमित प्रमाणांत काढणें त्यास भाग पडतें व त्यामुळें व्यापारी वर्गाला जर जास्त चलनाची गरज वाटूं लागली तर सरकार कांहीं त्याची गरज भागवूं शकणार नाहीं. त्यामुळें सरकारी चलनी नोटा पेढयांनीं कांहीं अटीवर काढिलेल्या नोटांपेक्षां कमी दर्जाच्या ठरलेल्या आहेत.

(२१) **नोटा कोणी काढाव्यातः**—आतां असा प्रश्न उद्भवतो कीं, ह्या नोटा काढण्याचा अधिकार सरकारास असावा किंवा पेढयांस असावा ? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें जरा कठीणच आहे. तरीपण सर्व सामान्य प्रवृत्ति अशी दिसते कीं, सरकारनें ह्या नोटा काढण्याचे भानगडींत पडूं नये. ह्यावर कांहीं लोक म्हणतात कीं, ज्याअर्थी नाणीं पाडण्याचा अधिकार सरकारासच असावा असें तुम्ही म्हणतां, त्याअर्थी चलनी नोटा सरकारनेंच सुरू कराव्या असें कोणी म्हटल्यास तुमची हरकत कां असावी ? पण अशा तऱ्हेचा मुद्दा जे लोक आणतात त्यांना नाणें म्हणजे काय ह्याची बरोबर कल्पना नाहीं असें म्हटलें पाहिजे. धातूंच्या लगडींचीं नाणीं पाडणें व कागदाच्या नोटा पाडणें ह्यांमध्यें महत्वाचें अंतर आहे. नाणीं पाडलीं तर तीं लोक, तीं खरी आहेत ह्याची खात्री पटल्यावर, तावडतोब स्वीकारतात. कारण त्या नाण्यांच्या किंमतीची धातु फारच थोड्या फरकानें त्या नाण्यांमध्यें असते; पण कागदी नोटांची पत सर्वस्वीं सरकारच्या पतीवर अवलंबून असते. म्हणून सरकारनें होतां होईल तों आपल्या पतीचा फायदा घेऊन आपण काढलेल्या नोटांचा प्रसार करूं नये.

नोटा फाजील प्रमाणांत काढण्याचा मोह पेढयांपेक्षां सरकारालाच जास्त होतो. कारण पेढयांना जनलज्जेचें भय असतें व एकदां आपल्यावरील जनतेचा विश्वास उडाला म्हणजे आपल्याला गाशाच गुंडाळला पाहिजे असा धाक पेढयांस असतो. पण लष्करी सामर्थ्यावर टिकलेल्या सरकारला लोकांना भिण्याचें कारण नसतें. दुसरें असें कीं, कागदी नोटा व्यापाराच्या सोयीच्या दृष्टीनें किती काढणें जरूर आहे हें जसें पेढ्यांना चटकन् समजतें तसें सरकारला-जरी तें सर्वज्ञ असलें तरी-समजणें शक्य नसतें व जरी समजलें तरी त्या नोटा

काढावयाच्या त्याबद्दल रोख नाणें देण्याची जबाबदारी असल्यामुळें व्यापाराच्या सोयीच्या दृष्टीनें हव्या तितक्या नोटा काढणें सरकारास शक्य नाहीं. अतएव पेढ्यानींच नोटा काढणें इष्ट असतें. मात्र पेढ्यांस नोटा काढण्याची अनिरुद्ध सत्ता देणें केव्हांही इष्ट नाहीं. सर्वच पेढ्या कांहीं पूर्ण सचोटीच्या नसतात, व सर्वच पेढ्या लोकांना लागतील तेवढ्याच नोटा काढतील व फाजील नोटा काढून आपला तळीराम गार करून घेणार नाहींत असें कोणी म्हणत नाहीं. म्हणून पेढ्यांना नोटा काढतांना कांहीं नियम अवश्य घालून दिले पाहिजेत; पण सरकारनें स्वतः नोटा काढणें निराळें व पेढ्यांना कांहीं नियमान्वयें नोटा काढण्यास परवानगी देणें हें वेगळें. हल्लीं हिंदुस्थानांत जर आपण परिस्थिति पाहिली तर आपणांस असें दिसून येईल कीं, कागदी नोटा पाडण्याचा मक्ता सर्वस्वीं सरकारनें आपल्याकडे राखून ठेवलेला आहे. त्यामुळें वर निर्दिष्ट केलेले तोटे येथें दिसून येण्याचा संभव आहे. महायुद्धाचे वेळीं ज्या वेळां रुपये व सावरिन दुर्मिळ होऊं लागले त्या वेळीं सर्व प्रकारच्या नोटा सरकारनेंच पाडिल्या होत्या; व कांहीं वेळ ह्या नोटांचा सुळसुळाट झाल्यामुळें किंमती वाढूं लागल्या व मध्यम वर्गांतील लोकांचे, ठराविक पगार असलेल्या नोकरांचे व मजूरांचे अवर्णनीय हाल होऊं लागले. हल्लींसुद्धां महायुद्ध संपलें तरी एकदा ज्या वस्तूंच्या किंमती चढलेल्या आहेत त्या मूळ पदावर येत नाहींत व ही महागाई कायमचीच होते किंवा काय अशी लोकांस भीति वाटूं लागली आहे.

(२२) **चलनी नोटा व वस्तूंच्या किंमती**:—वर सांगण्यांत आलेलेंच आहे कीं, नोटांचा प्रसार फाजील प्रमाणांत करण्यांत आला म्हणजे महागाई होऊं लागते. ह्याच विधानाचा आपण जरा विस्तारानें विचार करूं या. अर्थशास्त्रज्ञांचा असा एक सिद्धांत आहे कीं, एकाद्या देशांत मूळचाच जो पैसा असतो त्याचा जर दुप्पट किंवा तिप्पट केली तर इतर परिस्थिति तशीच असल्यास, वस्तूंची किंमत जरी त्याच पटीनें नाहीं तरी, बऱ्याच प्रमाणांत वाढूं लागते. आपला असा अनुभव आहे कीं, सोनें व चांदी ह्या धातु जेथें मुबलक असतात तेथें किंमती वाढलेल्या असतात. ज्या भागांत सोन्याचांदीच्या खाणी असतात तेथें वस्तूंच्या किंमती कल्पनेच्या बाहेर महाग असतात. इतिहास

आपणांस असें सांगतो कीं, अमेरिकेंत जेव्हां सोनें मुबलक व थोड्या खर्चात १६ व्या शतकांत सांपडूं लागलें व १९ व्या शतकांत कॅलिफोर्निया व आस्ट्रेलिया येथें सोन्याच्या खाणींचा शोध लागला त्या वेळीं सोन्याचा एकंदर संग्रह खूपच वाढल्यामुळें युरोपखंडांतील वस्तूंच्या किंमती एकदम चढूं लागल्या.

ह्या कारणांशिवाय वस्तूंच्या किंमती वाढण्याचीं दुसरींही कारणें आहेत. उदाहरणार्थ, जितक्या जास्त प्रमाणांत पैसा—मग तो पैसा नाण्याच्या रूपांत असो किंवा नोटांच्या रूपांत असो—लोकांच्या हातांत खेळत असतो तितक्या जास्त प्रमाणांत किंमती वाढत असतात. आपण अशी कल्पना करूं कीं, एक मोटारगाडी ५ तासांत १०० मैल प्रवास करते; त्याच गाडीनें जर तेवढ्याच वेळांत २०० मैल प्रवास केला तर आपणांस असें म्हणतां येईल कीं, दोन मोटार गाड्यांनीं ५ तासांत १०० मैल प्रवास केला. म्हणजे ५ तासांत दोनशें मैल प्रवास करणारी मोटारगाडी ही ५ तासांत १०० मैल प्रवास करणाऱ्या दोन मोटारगाड्यांच्या योग्यतेची झाली हें उघड आहे. त्याचप्रमाणें एक नाणें लोकांच्या हातून दोनदां गेलें काय व नाणीं त्यांच्या हातून एकदां गेलीं काय, दोन्ही गोष्टी एकच होत. हा नियम जर लक्षांत ठेवला तर पूर्वीचाच नाणीं जर जास्त प्रमाणांत लोक उपयोगांत आणूं लागले तर किंमती वाढणें सहजिकच आहे. हीं नाणीं लोकांनीं जर जास्त प्रमाणांत आणावयाचीं असतील तर उद्योगधंद्याची वाढ जास्त झाली पाहिजे व लोकसंख्याही वरीच पाहिजे. ह्या दोन्ही गोष्टी खेडेगांवापेक्षां शहरांत जास्त प्रमाणांत दिसून येत असल्यामुळें वस्तूंच्या किंमती शहरांतच वाढलेल्या आपणांस दिसतील.

असो. वर सांगितलेंच आहे कीं, देशांत पैसा फार झाला कीं जिनसांच्या किंमती वाढतात. हा पैसा एकतर धातूचीं नाणीं जास्त पाडलीं गेल्यानें वाढतो किंवा नोटांचा प्रसार फार वाढल्यानें होतो. ज्या वेळं उद्योगधंद्याची वाढ झाल्यामुळें लोकांना नाण्याची जास्त गरज असते अशा वेळीं जर हा पैसा वाढला तर जिनसांच्या किंमतीची वाढ जास्त होत नाहीं. पण अशी जर परिस्थिति नसेल व नोटा सरकार स्वार्थबुद्धीनें काढूं लागेल तर जिनसा हटकून महाग मिळूं लागतील. ह्याच मुद्याचा आपण जास्त खोल विचार करूं.

आपण अशी कल्पना करूं कीं, हिंदुस्थानांतील धातूंचीं नाणीं एकाच वेळीं व एकदम प्रचारांतून काढून घेण्यांत आलीं व त्या नाण्यांच्याऐवजीं तितक्याच किंमतीच्या कागदी नोटा सुरू करण्यांत आल्या. असा फरक केल्यानें जगांतल्या वस्तूंच्या किंमतींत कांहीं फरक होईल असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. आतां आपण अशी कल्पना करूं कीं, ह्या प्रचारांतून काढून घेतलेल्या नाण्यांतील सोनें ह्याच धातूंचीं नाणीं प्रचारांत असलेल्या देशांत आपण पाठवून दिलें. ह्याचा परिणाम असा होईल कीं, एकंदर जगांतील किंमती वाढतील व त्या मानानें हिंदुस्थानांतही जिनसा महाग होऊं लागतील. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, असें सर्व सोनें कांहीं परदेशीं पाठविण्यांत येत नाहीं. नेहमींचा अनुभव असा आहे कीं, ज्यावेळीं एखाद्या देशांत नोटा प्रचलित करण्यांत येतात तेव्हां त्या नोटांच्या किंमतीचें सोनें सर्वच कांहीं बाहेर न जातां त्यांची किंमत उतरल्यामुळें कांहीं सोनें दागिने, भांडीं वगैरे जिनसा बनविण्याकडे खर्च होतें. कांहीं सोन्याचा गुप्तसंचय होऊं लागतो व राहिलेलें सोनें परदेशीं पाठविलें जातें. अशी स्थिति असल्यामुळें जितकें सोनें कागदी नोटा सुरू करण्यांत आल्यामुळें अदृश्य होतें तितक्या मानानें जिनसांच्या किंमती वाढत नाहींत.

वरील विचारसरणीवरून आपणांस असें समजून येईल कीं, ज्या देशांत कागदी नोटा प्रचलित असतात त्या देशांतील वस्तूंच्या किंमती कमीजास्त होण्याचीं तीन कारणें आहेत. पहिलें कारण असें कीं, ह्या देशाचा जगांतील सोन्याचांदीचीं नाणीं वापरणाऱ्या देशांशीं संबंध असल्यामुळें ह्या धातूंचीं नाणीं वापरणाऱ्या देशांत उद्योगधंद्यांत होणाऱ्या चढउतारामुळें जर जिनसांच्या किंमती कमीजास्त झाल्या तर त्याचा परिणाम कागदी नोटा वापरणाऱ्या देशावर घडलाच पाहिजे. कारण अर्वाचीनकाळीं दळणवळणाचे मार्ग वाढल्यानें चोहोंकडे किंमती सारख्या होण्याकडे व्यापाराची प्रवृत्ति दिसून येते. दुसरें कारण असें कीं, ह्या कागदी नोटा वापरणाऱ्या देशांत सोन्यानें व्यक्त होणारी नोटांची किंमत सारखी बदलत असल्यानें जिनसांच्या किंमतींतही सारखे फेरफार होत राहणार. तिसरें कारण असें कीं, ह्या कागदी नोटांची किंमत पुढें किती राह-

णार ह्याचा अंदाज न करतां आल्यामुळें व्यापारी वर्गाची प्रवृत्ति सट्टेबाजीकडे राहणार व त्यामुळें किंमतीमध्यें विलक्षण चांचल्य राहील हें उघड आहे.

एखाद्या देशांत कागदी नोटांची किंमत किती उतरली आहे हें जर आपणास पहावयाचें असेल तर जिनसांची पूर्वीची किंमत व नोटांची किंमत उतरल्यामुळें आतां वाढिलेली जिनसांची किंमत ह्यांतील फरक काढिला म्हणजे झालें. पण आपण एक गोष्ट मात्र लक्ष्यांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, कागदी नोटांची किंमत उतरल्यानें आपणांस ह्या नोटांऐवजीं सोनें घेतांना जितक्या नोटा द्याव्या लागतील त्याहून जास्त नोटा इतर जिन्नस खरेदी करतांना द्याव्या लागतील. ह्याचीं अनेक कारणें आहेत; पण मख्य कारण असें आहे कीं, सोनें व इतर जिनसा ह्यांत फार फरक आहे. सोन्याची किंमत दररोज बदलूं शकते; पण इतर जिनसांची किंमत दररोज बदलूं शकत नाहीं. तेव्हां व्यापाऱ्यांची प्रवृत्ति जिनसांच्या [redacted] किंमती किमतीपेक्षां जास्त प्रमाणांत वाढविण्याकडे असते. दुसरें कारण असें आहे कीं, नोटांचा व जवीपेक्षां फाजील प्रमाणांत प्रचार करण्यांत आल्यानें सोनें प्रचारांत न राहतां तें सांठविलें जातें व तें एकदम जास्त झाल्यामुळें त्याची किंमत अगोदरच उतरूं लागते व नोटांचा प्रसार फार झाल्यामुळें आपणांस जर सोनें किंवा इतर वस्तु विकत घ्यावयाच्या असल्या तर पूर्वीपेक्षां आतां आपणांस जास्त नोटा द्याव्या लागणार. पण वर आपण पाहिलेंच आहे कीं, इतर वस्तूंच्या मनानें सोनें एकदम सांठविलें गेल्यामुळें त्याची किंमत अगोदरच थोडी उतरलेली आहे; त्यामुळें इतर वस्तु विकत घेतांना जितक्या नोटा आपणांस द्याव्या लागणार तितक्या नोटा तितक्याच किंमतीचें सोनें विकत घेतांना द्याव्या लागणार नाहींत. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, नोटा फार झाल्यामुळें इतर वस्तूंची नोटांच्या रूपानें व्यक्त होणारी किंमत जितकी वाढते तितकी सोन्याची किंमत वाढत नाहीं.

नोटा फाजील प्रमाणांत काढिल्यानें त्यांची किंमत किती उतरेल हें नक्की सांगणें शक्य नसतें. व्यापाराची व उद्योगधंद्याची वाढ होत असतांना जर लोकांना चलनाची जास्त गरज असली व आहेत त्या धातूंच्या नाण्यांनीं लोकांचें काम भागत नसलें व अशा वेळीं जर नोटा काढण्यांत आल्या तर अर्थात त्या

नोटांची किंमत उतरणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या राष्ट्रांत युद्ध चालूं असतांना किंवा बाजारभव उतरला असतांना व्यापारांत होणाऱ्या गडबडीमुळें जर सरकारनें नोटा काढिल्या तर अशा वेळींही त्यांची किंमत उतरत नाहीं; पण लोकांना गरज नसतांना जर नोटा काढण्यांत आल्या तर त्यांची किंमत अर्थांतच उतरणार. कधीं कधीं अशा रीतीनें काढिलेल्या नोटांची किंमत जर उतरावयास लागली तर सरकार एक युक्ती योजते. ती युक्ती म्हणजे लोकांनीं सरकारदेणें ह्या नोटांचे रूपानें दिलें असतां तें आपण स्वीकारूं असें सरकारनें जाहीर करणें ही होय. पण ह्या युक्तीचा परिणाम तात्पुरता होत असतो व नोटा जर थोड्या प्रमाणांत काढिल्या नसल्या तर तो परिणाम फारच थोडा असतो.

कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं, आपणांस मिळालेल्या नोटांबद्दल सरकाराकडून पुढेंमागें नाणीं मिळण्याचा संभव आहे असा जर लोकांचा नुसता भरंवसा असला तरी सुद्धां नोटांची किंमत उतरणार नाहीं. पण असा लोकांचा जर भरंवसा असेल तर एवढेंच होईल कीं, लोक त्या नोटा सांठवून ठेवतील, पण त्यांची किंमत उतरल्यावांचून केव्हांही रहाणार नाहीं. कारण अर्थशास्त्राचा असा नियम आहे कीं, चलनी नाण्याची सध्यां जी वस्तू विकत घेण्याची शक्ति आहे तिजवरच ह्या नाण्याची किंमत अवलंबून रहाणार.

वरील विवेचनाचा इत्यर्थ इतकाच आहे कीं, चलनी नोटा—विशेषतः ज्या नोटांबद्दल नाणीं मिळावयाचीं नसतात अशा नोटा—प्रचारांत आणतांना फार काळजी घ्यावयास पाहिजे. धातूंचीं नाणीं व कागदाचे तुकडे ह्यांमध्यें केव्हांही फरक रहाणारच. सरकार जेव्हां अशा नोटा काढित असतें तेव्हां त्याचा मूळ हेतु असा असतो कीं, आपली पत इतर राष्ट्रांत कांहीं कारणांनीं गेल्यामुळें आपणांस कर्ज मिळत नाहीं; तें कर्ज बिनव्याजानें व परत न देण्याच्या बोलीनें देशांतल्या देशांत आपणांस मिळावें. पण असें करतांना आपण आपल्या प्रजेस नाहक लुबाडतों आहोंत याची जाणीव सरकारास नसते व सरकारास पैसा मिळविण्याचा बिनखर्चाचा मार्ग सांपडल्यामुळें नवीन नवीन नोटा काढण्याचा मोह त्यास आवरत नाहीं व त्यामुळें त्या सरकारची नैतिक व राजकीय अधो-

गति झपाट्यानें सुरू होते. नाणें काय किंवा नोटा काय ह्या विनियमसाधन म्हणून व्यापाराचे सोयीकरितां सुरू करावयाच्या असतात; सरकारी उत्पन्नाची बाब म्हणून नव्हे; व अशा रीतीनें वाजवीहून फाजील प्रमाणांत नोटा एकदां सुरू करण्यांत आल्या म्हणजे राष्ट्राचा विनाशकाल जवळ आला म्हणून समजावें.

असो. आतांपर्यंत आपण चलनाच्या मूलतत्त्वांची चर्चा केली. आतां आपणांस हिंदुस्थानांत जी चलनपद्धति प्रचारांत आहे ती प्रथम अस्तित्वांत कशी आली, त्या पद्धतीचे कोणते परिणाम हिंदुस्तानच्या सांपत्तिक स्थितीवर घडून आले व येत आहेत व त्या पद्धतीसंबंधानें कोणत्या सुधारणा करणें इष्ट आहे वगैरे मुद्यांची सांगोपांग चर्चा करावी लागेल. ती चर्चा वाचण्यास वाचकांनीं सावधान चित्त असावें अशी प्रेमाची सूचना करून ही तात्विक चर्चा येथें आटपती घेतों.

---

# भाग ३ रा.

—:-×०×-:—

## १९ व्या शतकांतील चलनपद्धति.

१९ व्या शतकांतील चलनपद्धतीच्या इतिहासाचे बरोबर चार भाग करतां येतील. पहिला भाग १८३५ सालापर्यंतचा होय. त्या वर्षी सरकारनें एक कायदा करून सर्व हिंदुस्थानाकरतां रुपयाचें नाणें प्रचलित करण्याचा ठराव केला. हिंदुस्थान देश अवाढव्य असल्यामुळें त्या देशांत एकछत्री राज्यें फार थोडीं असत व त्यामुळें सर्व देशभर एकच नाणें सुरू होणें शक्य नव्हतें. हिंदुस्थानची चलनपद्धति ह्या आपल्या पुस्तकांत म्याकलिआडनें म्हटल्याप्रमाणें इंग्रजी

अम्मल सुरू होण्यापूर्वी ह्या देशांत सोन्याचीं व रुप्याचीं मिळून ९९४ नाणीं सुरू होतीं. अशीं शेंकडों नाणीं प्रचारांत असण्याचें मुख्य कारण असें होतें कीं, नाणीं पाडणें हें सार्वभौम सत्ता दर्शविण्याचें एक अंग समजलें जाई व सार्वभौम राजे व मांडलिक राजे आपल्या नांवाचीं नाणीं पाडून आपलें वैभव प्रकट करण्यास उत्सुक असत. दुसरा भाग १८३५ पासून सुरू होऊन १८७४ सालीं समाप्त होतो. ह्या सालीं एक ठराव सरकारनें केला. ह्या कालांत सोन्याचीं नाणीं सुरू करण्याबद्दल प्रयत्न झाले. तिसरा भाग १८७४ सालापासून सुरू होऊन १८९३ सालीं संपूर्ण होतो. या कालांत हुंडणावळीच्या भावांत बरेच फेरफार होऊन त्यापासून लोकांस बराच त्रास भोगावा लागला व त्यामुळें चलनी नाण्याच्या पद्धतींत कांहीं तरी सुधारणा व्हावी एतदर्थ जोराचे प्रयत्न सुरू झाले. चवथा भाग १८९३ पासून सुरू होतो व १९२० सालीं तो संपतो. ह्या कालांत लोकांना रुप्याचीं नाणीं सरकारी टांकसाळींतून पाडून घेण्याची बंदी झाली व सोन्याचें नाणें हिंदुस्थानांत सुरू करण्यांत आलें. ह्याच कालांत हर्शेल कमिटी व फौलर कमिटी नेमण्यांत येऊन त्या कमिटींनीं केलेल्या महत्वाच्या सूचना मंजूर करण्यांत आल्या. ह्यापुढें विसाव्या शतकांतील चलनपद्धतीच्या इतिहासाचे आपणांस आणखी दोन भाग म्हणजे सर्व मिळून सहा भाग करतां येतील. व त्यापैकीं पांचवा भाग १९१० पासून १९१३ पर्यंतचा होय. ह्या कालांत हिंदुस्थानांत १९०७-८ सालीं दुष्काळ पडून निर्गत मालापेक्षां आयात माल जास्त प्रमाणांत आला व हिंदुस्थानांतील सरकाराला विलायतेंतील स्टेट सेक्रे-रीवर उलट हुंड्या विकण्याचा प्रसंग येऊन विलायतेमध्यें ठेवलेल्या सुवर्णनिधीला ओहटी लागली व प्रचलित चलनपद्धति सदोष आहे किंवा निर्दोष आहे व हिंदुस्थानांत टांकसाळ सुरू करून सोन्याचीं नाणीं सुरू करावीं किंवा नाहीं ह्या प्रश्नावर बरीच भवति न भवति झाली; व १९१३ सालीं चेंबरलेन कमिशन नेमलें गेलें. सहावा भाग म्हणजे युद्धकालीन भाग होय. सर्वच जगांत ह्या युद्धानें व्यापारांत भयंकर घडामोड उत्पन्न केल्यानें चलनी नाण्याचा प्रश्न पुनः उपस्थित होऊन बॅबिंग्टन कमिशन नेमलें गेलें व हुंडणावळीचा भाव सर-

कारास बदलावा लागला. चलनी नाण्याच्या इतिहासाचे असे हे सहा भाग स्थूलमानानें होतात. ह्याच भागांचा आपण आतां विस्तारानें विचार करूं.

**( २४ ) सोन्याचें नाणें सुरू करण्याबद्दलचे सरकारी प्रयत्नः**—वर म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानांत सोन्यारुप्याचीं शेंकडों नाणीं असल्यामुळें त्यांचा एकमेकांशीं बिलकूल संबंध नसे. उत्तर हिंदुस्थानांत रुपयाचें नाणें विस्तृत प्रमाणांत चालू होतें व सोन्याची मोहोर ही पुरवणीवजा होती. पण दक्षिण हिंदुस्थानांत ह्याच्या उलट स्थिति होती. असा फरक असण्याचें हें कारण दिसतें कीं, दक्षिणेंत मुसलमानांचा अम्मल दृढमूल झालाच नाहीं त्यामुळें त्यांच्या नाण्यांचा प्रसार ह्या भागांत फारसा झाला नाहीं. एवढी मात्र गोष्ट खरी कीं, हिंदुस्थानांत सोन्याचीं व रुप्याचीं दोन्हीं नाणीं सर्रास चालू होतीं. अठराव्या शतकाच्या अखेरीस कंपनी सरकारास हीं नाणीं रद्द करून सर्व हिंदुस्थानांत एक नाणें चालू करण्याची जरूर भासूं लागली. १८०६ सालीं विलायतेंतील कोर्ट आफ् डायरेक्टरनें मद्रास सरकाराला एक खलिता लिहिला. ह्या खलित्यांत डायरेक्टर असें स्पष्ट लिहितात कीं, हिंदुस्थानांत संपत्ति मोजण्याचें साधन म्हणजे नाणें हें एकाच धातूचें असलें पाहिजे; मग तो धातु सोनें असो किंवा रुपें असो. हिंदुस्थानची परिस्थिति ध्यानांत घेतां रुप्याचेंच नाणें लोकांस जास्त फायदेशीर होईल हें उघड आहे. तरीपण सोण्याचें नाणेंही लोकांमध्यें सुरू असावें अशी आमची इच्छा आहे. ह्या दोन्हीं नाण्यांचें वजन १८० ग्रेन असावें व त्यांपैकीं १६५ ग्रेन शुद्ध चांदी किंवा सोनें असावें व १५ ग्रेन तांब्यासारख्या इतर धातूची भेसळ असावी. ह्या मुख्य नाण्याशिवाय अर्धा रुपया व पाव रुपया हीं नाणीं सोन्याचीं व रुप्याचीं असावींत; व दोन्हीं धातूंच्या नाण्यांचें वजन, सफाई व नांव सारखींच असावींत.

पण ही सोन्याचा रुपया सुरू करण्याची डायरेक्टरांची इच्छा कागदोपत्रींच राहिली; कारण १८१८ सालीं मद्रास इलाख्यांत सोन्याच्या नाण्याचेऐवजीं रुप्याचें नाणें सुरू करण्यांत आलें व १८३५ सालीं सर्व हिंदुस्थानभर १८० ग्रेन वजनाचें रुप्याचें नाणें प्रचालित करण्यांत आलें व सोन्याचें नाणें

प्रचारांतून जात चाललें. तरी मधून मधून सोन्याच्या नाण्याचा प्रचार करण्याचे प्रयत्न सरकार करीतच होतें. ह्याच वर्षी सोन्याचीं नाणीं पाडण्यांत यावींत असें सरकारनें ठरविलें. १८४१ सालीं सरकारानें एक जाहिरनामा काढला व १५:१ अशा प्रमाणांत असलेल्या सोन्याच्या मोहरा जर लोकांनीं खजिन्यांत आणिल्या तर त्यांचा स्वीकार अधिकाऱ्यांनीं करावा असा हुकूम सोडला. अशा रीतीनें सरकारी देणें देतांना लोकांनीं सोन्याच्या नाण्याचा उपयोग करावा असे जरी सरकारनें प्रयत्न केले तरीपण लोकांमध्यें ह्या सोन्याच्या नाण्याचा फारसा प्रसार झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर सोन्याचें नाणें लोकांच्या दृष्टीनें पाहतां खरें नाणेंच नव्हे असा उल्लेख सरकारी कागदोपत्रीं सांपडतो.

१८४७ सालानंतर कॅलिफोरनिया व आस्ट्रेलिया ह्या देशांत सोनें मुबलक सांपडल्यामुळें सोन्याची किंमत रुप्याच्या मानानें उतरूं लागली. त्यामुळें अर्थातच लोक सरकारसारा सोन्याच्या नाण्यांत देऊं लागले व सरकाराला आपला १८४१ सालचा जाहिरनामा परत घ्यावा लागला. तरीपण एवढी गोष्ट खरी आहे कीं, सोन्याची किंमत जितकी उतरेल असें सरकारास वाटलें होतें तितकी न उतरल्यामुळें पुनः सोन्याचीं नाणीं सुरू करण्याचे प्रयत्न सुरू झाले.

१८५९ सालीं हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या दृष्टीनें एक महत्वाची गोष्ट घडून आली. ती अशी कीं, फडनविशी खातें प्रथमच निर्माण होऊन त्यावर वुइलसनसाहेबाची नेमणूक झाली व हिंदुस्थानसरकारच्या जमाखर्चाला व्यवस्थित वळण लागलें व ह्याच साहेबाच्या कारकीर्दींत हिंदुस्थानांत चलनी नोटा सुरू करण्यांत येऊन लवकरच त्याचे पश्चात एक कायदा करण्यांत आला. पण हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याचे विरुद्ध हा साहेब होता व त्याच्याच मताची री सर चार्लस वूडनें ओढली. तो आपल्या खलित्यांत म्हणतो ' हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याबद्दल खटपट करणें विलायत सरकाराला इष्ट वाटत नाहीं ह्याचें कारण लोकांच्या गरजा चलनी नोटांनींच जास्त भागतील असें त्या सरकारास वाटतें.

असो. एकट्या विलसनसाहेबाशिवाय ह्या काळांतल्या प्रत्येक फडन-

विसाचें मत हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करावें असेंच होतें. ह्या वेळेचा हिंदुस्थानसरकारनें विलायत सरकारशीं केलेला पत्रव्यवहार व हिंदुस्थानसरकारशीं कलकत्ता, मुंबई, मद्रास येथील ' चेंबर आफ् कामर्स ' व हिंदी व्यापाऱ्यांची मुंबई व कलकत्ता येथील सभा ह्यांनीं केलेला पत्रव्यवहार जर आपण चाळून पाहिला तर आपणास हेंच दिसून येईल कीं, ह्या सर्व संस्थांचें व हिंदुस्थानसरकारचें हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याचे बाबतींत ऐकमत्य होतें. पण मुख्य अडचण अशी होती कीं, विलायतसरकार व त्याच्य ताब्यांत असलेला स्टेट सेक्रेटरी हे ह्या कृत्याला प्रतिकूल होते.

**( ३५) सररिचर्ड टेंपल व डिकसनच्या सूचना:**—ह्याच वेळीं युरोपखंडांत चलनी नाण्याबद्दल जारीनें चर्चा चाललेली होती. १८६७ सालीं पॅरिस येथें यूरोप व अमेरिका येथील १८ राष्ट्रांची एक परिषद् भरली होती. ह्या परिषदेनें असा ठराव केला कीं, आंतरराष्ट्रीय व्यवहारामध्यें सोनें हीच धातु सोयीची आहे व एकचलनपद्धतीचाच सर्व राष्ट्रांनीं स्वीकार करावा व ज्या अर्थी सोन्याला जास्त मागणी येऊन तें दिवसानुदिवस जास्त दुर्मिळ होत जाणार त्याअर्थी ज्या राष्ट्रांत रुप्याचेंच नाणें अगोदरच सुरू आहे किंवा द्विचलनपद्धति प्रचारांत आहे त्या राष्ट्रांत ह्या दोन धातूंच्या किंमतींत असा संबंध रहावा कीं, त्यामुळें त्या देशांत सोन्याचा प्रसार फारसा होऊं नये.

१८७० सालीं मागील सर्व कायद्यांचें एकीकरण करून हिंदुस्थान सरकारनें ' हिंदुस्थानांतील नाण्याचा कायदा पास केला; ह्या चलनीनाण्याच्या इतिहासाच्या दुसऱ्या भागाच्या शेवटल्या कालांत दोन गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतात. पहिली गोष्ट अशी कीं, ह्याच वेळीं सोन्याच्या किमतीनें व्यक्त होणारी रुपयाची किंमत उतरूं लागली व दुसरी गोष्ट म्हणजे सोन्याचें नाणें प्रचलित करण्याचे प्रयत्न पुनः सरकारनें केले ही होय.

१८७२ सालीं सर रिचर्ड टेंपलसाहेबानें एक विस्तृत खलिता हिंदुस्थानसरकारापुढें मांडून कांहीं सूचना केल्या. त्या अशा:—( १ ) १५, १०, व ५ रुपयांचीं नाणीं हिंदुस्थानांत आहेत, पण तीं कायदेशीर मानलीं जात नाहींत.

)२) सरकारनें कायदा करून तशीं तीं मानण्याबद्दल खटपट करावी. (३)सोनें व चांदी ह्यांच्या परस्पर किंमतीचें प्रमाण काय असावें हें निश्चित करण्याकरतां एक कमिशन नेमण्यांत यावें. (४) हें कमिशन नेमीपर्यंत हिंदुस्थानांत जास्त सोनें आणण्याबद्दल जुजबी उपाय योजण्यांत यावेत.

तसेंच त्या वेळच्या फडणविसानें त्या वेळच्या बंगालच्या बँकचे सेक्रेटरी मि. डिकसन ह्यांच्याही सूचना सरकारकडे पाठवून दिल्या. त्या सूचनांचा मतितार्थ एवढाच होता कीं, सरकारनें लोकांना हिंदुस्थानाच्या खजिन्यांत इंग्लिश च आस्ट्रेलियन साव्हरिन, सरकार देणें म्हणून, किंवा रुप्याच्या बदला म्हणून बिनशर्त आणून देण्यास परवानगी द्यावी. तसेंच चलनी नोटांच्या कायद्याच्या कलमाला अनुसरून जे लोक टांकसाळींत ठराविक नंबराचें १० रुपयांकरतां १२० ग्रेन वजनाचें सोनें आणून देतील त्यांना नफा न घेतां सोन्याच्या मोबदला नोटा काढून द्याव्या. सर रिचर्ड टेंपलसाहेबानें आपल्या सूचना पुनः एकदां सरकारासमोर मांडल्या. ह्या चळवळीचा एकंदर परिणाम असा झाला कीं, १८७४ सालीं हिंदुस्थान सरकारनें एक ठराव प्रसिद्ध केला व त्यांत आपलें धोरण व्यक्त केलें. तें असें कीं, एकंदरींत विचार करतां हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सर्रास सुरू करणें सध्यांच्या परिस्थितींत शक्य आहे असें सरकारास वाटत नाहीं. तरीपण डिकसनसाहेबाची दुसरी सूचना सरकारास मान्य आहे.

**(२६) लॅटिनलीग व द्विचलनपद्धति :**—आतांपर्यंत चलनी नाण्याच्या इतिहासाच्या दुसऱ्या भागाचें विवेचन झालें. आतां ज्या भागाचें विवेचन करावयाचें तो भाग अत्यंत महत्त्वाचा आहे; कारण ह्या भागांत चलनी नाण्यासंबंधानें बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. ह्या काळांत ह्याविषयासंबंधानें सरकारनें प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांचें जर आपण पर्यालोचन केलें, तर आपणांस एक गोष्ट अशी दिसून येईल कीं, सरकारनें ह्या काळांत बरेंच पांढऱ्याचें काळे केलें; पण प्रत्यक्ष कृति अशी फारच थोडी केली. जरी १८७४ सालापासून सोनें व चांदी ह्यांच्या किंमतींत विलक्षण फरक पडला होता तरी १८९३ पर्यंत सरकारनें ह्या बाबतींत कांहींच इलाज केले नाहींत. तथापि सरकारवतीनें जर कांहीं सांगतां येईल तर तें हें कीं, ह्या काळांत द्विचलनपद्धति.

बद्दल बरीच चर्चा करण्यांत आली. कांहीं राष्ट्रांचें असें मत बनत चाललें होतें कीं, जर सर्व राष्ट्रांनीं एकमतानें ही द्विचलनपद्धति स्वीकारली तर ती यशस्वी होणें शक्य आहे. पण ब्रूसेल्स येथें १८९२ सालीं परिषद् भरून तेथें जेव्हां सर्व राष्ट्रांचें एकमत होईना व इंग्लंदनें आपलाच हट्ट चालवून एकचलनपद्धति अंमलांत आणण्याचा निश्चय जाहीर केला तेव्हां ह्या द्विचलनपद्धतीचा अशक्य-पणा स्पष्ट होऊं लागला व हिंदुस्थानांत रुप्याच्या किंमतीसंबंधानें कांहीं तरी निश्चित धोरण स्वीकारलें पाहिजे असें येथील सरकारास वाटलें.

ह्या ठिकाणीं द्विचलनपद्धतीबद्दल थोडी माहिती सांगितली असतां ती अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटतें. देशांत जर एकच चलनपद्धति असेल तर त्याचा असा परिणाम होतो कीं, ज्या धातूचें नाणें प्रचलित असेल त्या धातूची किंमत जर कमीजास्त झाली तर तावडतोब त्या किंमतीच्या फरकाचा व्यापारावर परिणाम होतो. वास्तविक पाहिलें असतां कोठल्याही देशांत एकाच धातूच्या नाण्यावर तेथील सरकारनें अवलंबून राहूं नये. अशा प्रकारें विचार केला असतां बहुचलनपद्धति हीच श्रेयस्कर व तात्विक दृष्ट्या श्रेष्ठ आहे. असो; सध्यां आपणांस द्विचलनपद्धतीचाच विचार कर्तव्य आहे. ज्या वेळीं सोनें व चांदी ह्या दोन्ही धातूंचीं नाणीं व्यवहारांत व सरकारदेण्यांत बिनशर्त स्वीकारण्यांत येतात त्या वेळीं द्विचलनपद्धति प्रचलित असते. हल्लीं हिंदुस्थानांत जरी सोनें व चांदी ह्या धातूंचीं नाणीं उपयोगांत आहेत तरी हिंदुस्थानच्या अंतर्व्यवहारांत मुख्यतः रुपयाच प्रचार आहे व परराष्ट्रीय व्यवहारांत सोन्याच्या नाण्याचा प्रचार आहे; त्यामुळें ह्या देशांत द्विचलनपद्धति आहे असें म्हणतां येत नाहीं. ज्या देशांत ही पद्धति चालू करण्याची खटपट करण्यांत आली तेथें तेथील सरकारास मुख्य अडचण अशी आली कीं, सोनें व चांदी ह्यांच्या मूळ किंमतींत म्हणजे बाजारांत ठरणाऱ्या व सरकारानें कायद्यानें ठरविलेल्या नाण्याचे किंमतींत सादृश्य कसें सांभाळावयाचें? ह्या दोन धातूंच्या नाण्यांच्या दुहेरी किंमतींत जर फरक पडूं लागला तर ज्या नाण्याची किंमत उतरली असेल तें नाणें ग्रेशॅम सहेबानें शोधून काढलेल्या नाण्यांच्या नियमाप्रमाणें दुसऱ्या नाण्यास हांकून देतें व एक तर तें आटविलें जातें किंवा लोकांकडून

सांठविलें जातें किंवा परदेशाच्या व्यापाऱ्यांकडे मालाच्या किंमतीबद्दल पाठविलें जातें. तेव्हां द्विचलनपद्धति जर यशस्वी व्हावयाची असेल तर सर्व राष्ट्रांनीं ऐकमत्य केल्यास ती यशस्वी होईल व सर्व राष्ट्रांनीं तिचा स्वीकार करावा अशाबद्दल फ्रान्स, अमेरिका वगैरे 'लॅटिन लीग्' ह्या संघामध्यें असलेल्या राष्ट्रांनीं अनेक वेळां परिषदा भरवून खटपट केली; पण ह्या खटपटीस मुख्यतः इंग्लंडकडूनच विरोध करण्यांत आला. इंग्लंडचें म्हणणें असें कीं, 'सोन्याचें नाणें सोडून सोन्यारुप्याचीं दोन्ही नाणीं जर कायदेशीर मानण्यांत आलीं तर त्यामुळें होणारें स्थित्यंतर 'भयंकर' होईल; त्याचप्रमाणें आपलें व्यापारी श्रेष्ठत्व हें देशांत असलेल्या सोन्याच्या नाण्यावरच अवलंबून आहे व ही गोष्ट जर्मनी देशालासुद्धां पटून त्या देशांत आपलेंच धोरण स्वीकारण्यांत आलें आहे. तेव्हां आपण जर द्विचलनपद्धति सुरू केली तर आपल्या व्यापारास धक्का बसेल. त्याचप्रमाणें आपला देश हा धनको देश आहे व त्याला परराष्ट्रांकडून जें व्याज आजपर्यंत सोन्याचे नाण्यांत मिळत आहे तें आतां किंमत उतरलेल्या चांदीच्या नाण्यांत आपणाला घ्यावें लागेल व त्यामुळें आपला मोठाच तोटा होईल, पण इंग्लंडनें ही पद्धत न स्वीकारण्याचें मुख्य कारण असें होतें कीं, बँका व इतर पैशाचा व्यवहार करणाऱ्या संस्था ह्या चांदीची किंमत कमी झाल्यामुळें सोन्याऐवजीं तिचा मोबदला स्वीकार करण्यास कबूल होईनात.

वास्तविक पाहिलें असतां इंग्लंडचा हा विरोध निष्कारण होता व त्या देशानें सांगितलेलीं विरोध करण्याचीं कारणें तितकीं सयुक्तिक दिसत नाहींत. शिवाय ही द्विचलनपद्धति जर सुरू करण्यांत आली असती तर त्यापासून कांहीं फायदेही झाले असते. उदाहरणार्थ, ह्या पद्धतीनें दोन्ही धातूंचीं नाणीं जर नित्य व्यवहारांत विनशर्त उपयोगांत आलीं तर जगांतील पेढ्यांना आपल्या जवळ असलेल्या शिलकीची व्यवस्था अधिक सुलभ रीतीनें करतां येईल व जगांत जें सोन्याला फाजील महत्त्व आहे व त्यामुळें त्याचा संचय करण्याकडे जी विशेष प्रवृत्ति दिसून येते. ती दिसून येणार नाहीं. त्याचप्रमाणें ह्या पद्धतीमुळें परराष्ट्रांशीं होणारे पैशाचे व्यवहार जास्त सुलभ होतील व दोन देशांच्या हुंडणावळीच्या भावांत फारसा फरक राहणार नाहीं. आपला असा अनुभव आहे कीं,

जगांतील निम्मीं राष्ट्रें सोन्याचीं नाणीं वापरतात व बाकीचीं राष्ट्रें चांदीचीं नाणीं वापरतात. ह्या दोन्ही नाण्यांपैकीं एक नाण्याची किंमत कमीजास्त झाली कीं तावडतोब पदार्थांच्या किंमतीवर परिणाम होऊन जगाच्या व्यापारावरही तावडतोब परिणाम होतो. हा जर दोष टाळावयाचा असेल तर ही द्विचलन-पद्धतीच चोहोंकडे सुरू झाली पाहिजे.

कदाचित् कोणी अशी शंका घेईल कीं, द्विचलनपद्धति यशस्वी होण्याला लागणारी जी मुख्य अट कीं, सर्व राष्ट्रांनीं एकमतानें ही पद्धत अमलांत आणण्याचें ठरविलें पाहिजे ती अट साध्य होणार कशी ? पण ही अट जितकी अशक्य वाटते तितकी नाहीं. एकसमयावच्छेदेंकरून व एकाच पद्धतीवर जर सर्व राष्ट्रांनीं वागण्याचें ठरविलें तर ही गोष्ट अगदीं अशक्य नाहीं. सर्व राष्ट्रांनीं जर सोन्यारुप्यांत एक ठराविक प्रमाण ठरविलें व दोन्हीं धातूंच्या नाण्यांकरतां टांकसाळी खुल्या ठेविल्या तर ही पद्धत सुरू करणें अवघड जाणार नाहीं. असो. पण इतके जरी फायदे ह्या पद्धतीपासून मिळणारे होते तरी इंग्लंडनें आपल्या पेढ्यांच्या मुरवतीस्तव आपली संमति न दिल्यामुळें ही द्विचलनपद्धति अमलांत येऊं शकली नाहीं. ह्याचा परिणाम असा झाला कीं, जगांतील प्रमुख राष्ट्रांस सोन्याचें नाणेंच कायम करावें लागलें, चांदीचें नाणें चिल्हर कामाकरितां उपयोगांत आणावें लागलें व हीं नाणीं किती पाडावयाचीं ह्यावर आपला ताबा ठेवून सोनें व चांदी ह्यांचे परस्परसंबंध कायम ठेवावे लागले.

(२७) **हिंदुस्थानसरकारच्या अडचणी:**—आतांपर्यंत आपण विषयांतर करून द्विचलनपद्धति म्हणजे काय आहे ह्याचा विचार केला. वर आपण पाहिलेंच आहे कीं, हिंदुस्थान सरकारनें १८७५ सालीं आपलें निश्चित धोरण काय राहील हें जाहीर केलेंच होतें. पण ज्या वेळीं ही द्विचलनपद्धति नामशेष होणार हें निश्चित झालें तेव्हां हिंदुस्थानांत चांदीचा भाव एकदम उतरूं लागला. कारण बहुतेक देशांतून चांदीचें उच्चाटन होऊन ती हिंदुस्थानांत जास्त प्रमाणांत येऊं लागली. १८३५ सालापासून १८९९ सालापर्यंत हिंदुस्थानांत मुख्य नाणें चांदीचेंच होतें. पण ह्या सालानंतर तें जाऊन सोन्याचें नाणें

कायदेशीर ठरविणें सरकारास भाग पडलें. हिंदुस्थानाला विलायतेंत स्टेट सेक्रेटरीला क्रोडो रुपये द्यावे लागतात. कारण कीं, स्टेट सेक्रेटरी व त्याचें कौन्सिल ह्यांचा खर्च* हिंदुस्थानांतून ३० वर्षें मुलकी व लष्करी नोकरी करून परत गेलेल्या गोऱ्या नोकरांस द्यावें लागणारें पेन्शन, वगैरे खर्चांबद्दल हिंदुस्थानच जबाबदार आहे. त्याचप्रमाणें येथील विलायती व्यापारी व गोरे कामगार लोक ह्यांना आपला नफा व पगार विलायतेस पाठवावयाचा असतो. आतां हिंदुस्थानांत कर रुपयाचे रूपानें घेण्यांत येतो व विलायतेंत रुपयाला कोणी विचारीत नसल्याकारणानें तेथें सोन्याच्या नाण्याच्या रूपानें पैसे पाठवावे लागतात; तेव्हां चांदीची किंमत जर उतरूं लागली तर येथून जास्त रुपये पाठवावे लागणार; व ह्या वर्षी चांदीचा भाव इतका उतरला म्हणून इतके जास्त रुपये बाजूला काढून ठेवावे तर पुढल्या वर्षी जास्त भाव उतरल्यामुळें किती रुपये जास्त काढून ठेवावयाचे हें अंदाजपत्रक करण्याचे वेळीं हिंदुस्थानांतील फडणविसाला नक्की ठरवितां येत नसे. शिवाय हे जास्त रुपये द्यावे लागणें म्हणजे हिंदुस्थानांतल्या अत्यंत गरीब प्रजेला नाहक भुर्दंडच होय. तेव्हां ही अडचण दूर होण्यास काय उपाय योजावे ह्याविषयीं बरीच चर्चा सुरू झाली. येथील व्यापारी वर्गानें आपल्या सूचना हिंदुस्थान सरकारकडे पाठवून त्यास असें कळविलें कीं, चांदीची किंमत उतरण्याचा जो संभव दिसतो तो कमी करण्याकरतां सरकारानें कांहीं दिवस टांकसाळ बंद ठेवावी. पण हें म्हणणें हिंदुस्थान सरकारानें मान्य केलें नाहीं. कारण सरकारचें म्हणणें असें पडलें कीं, आजपर्यंत चालत आलेल्या नाण्याच्या किमतींत ढवळाढवळ करणें इष्ट होणार नाहीं.

पण हें उत्तर जेव्हां सरकारनें दिलें त्यानंतर दोनच वर्षांनीं सरकारला आपलें धोरण बदलावें लागलें. चांदीची किंमत जास्त जास्त उतरूं लागली व ब्रुसेल्स येथील परिषदेंत नक्की निर्णय होण्याचें लक्षण दिसेना. तेव्हां हिंदुस्थान सरकारनें येथील व्यापारी वर्गाच्या सूचना स्टेट सेक्रेटरीकडे पाठवून त्यास असें कळविलें कीं, हिंदुस्थानांतील टांकसाळी चांदीच्या नाण्याकरतां बंद ठेवण्यांत

* ह्या वर्षापासून स्टेट सेक्रेटरीचा खर्च विलायत सरकार देणार आहे.

याव्यात व हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्यांत यावें; पण ह्या सूचना स्टेट सेक्रेटरीनें विलायत सरकारचा विरोध होता म्हणून फेंटाळून लाविल्या. परंतु शेवटीं ब्रूसेल्स परिषदेचा बोजवारा झाल्यावर व हिंदुस्थानांत फारच जोराची चळवळ सुरू झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारनें पुनः एक खलिता स्टेट सेक्रेटरीकडे पाठविला व त्यांत असें स्पष्ट कळविलें कीं, आपण १ रुपायास १८ पेन्स ह्या दरानें हिंदुस्थानांत सोन्याचीं नाणीं सुरू करणार व रुप्याचीं नाणीं पाडण्यास टांकसाळी बंद ठेवणें व सोन्याचीं नाणीं पाडण्यास आरंभ करणें ह्यांमध्यें कांहीं कालावधि जाऊं देणार. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत साव्हरेन येऊं देण्याच्या अधिकाराचा उपयोग आपण आपद्धर्म करूं असेंही सरकारनें त्यास कळविलें.

(२७) **हर्शेल कमिटीची नेमणूकः**—ह्या सूचना स्टेट सेक्रेटरीकडे आल्यावर त्यानें लॉर्ड हर्शेलच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. ह्या कमिटीनें सर्व गोष्टींचा विचार करून आपला रिपोर्ट तयार केला. ह्या रिपोर्टांत तिनें असें म्हटलें कीं, ह्यापुढें टांकसाळी लोकांच्या दृष्टीनें बंद राहतील; तरीपण १६ पेन्सला १ रुपाया ह्या दरानें जर कोणी सोनें आणून देईल तर त्याला रुपये पाडून मिळतील; त्याचप्रमाणें ह्याच दरानें सरकारी देणें देतांना जर कोणी सोनें आणून देईल तर तें खजिन्यांत स्वीकारलें जाईल. ह्या सूचना जर अमलांत आल्या तर कमेटीच्या मतें चलनी नाण्याच्या वाढीची संक्रमणावस्था अधिक सुलभ होऊन तिजमध्यें फारशा विलक्षण घडामोडी होणार नाहींत.

ह्या सूचनांचा स्वीकार करून सरकारनें एक नाण्याचा कायदा पास केला व ह्या कायद्यान्वयें लोकांना तेवढ्या टांकसाळी बंद व्हाव्यात, पण सरकारला मात्र वाटेल तेवढे रुपये पाडण्याचा अधिकार असावा असें ठरलें. सरकारनें जाहीरनामे काढून लोकांना असें कळविलें कीं, जर लोकांनीं रुपयास १६ पेन्स ह्या दरानें सोनें टांकसाळींत आणून दिलें तर तें रुपयाचे मोबदला म्हणून घेण्यास आपण तयार आहों. त्याचप्रमाणें जर कोणी सरकार देणें देतांना १५ रुपयांबद्दल १ साव्हरिन ह्या दरानें साव्हरिन व अर्धे साव्हरिन आणून देईल तर त्यांचाही आपण स्वीकार करूं. ह्या जाहीरनाम्याचा एकंदर असा परिणाम झाला

कीं, चांदीची किंमत व रुपयाची किंमत ह्यांत तफावत पडली व रुपया हा हिंदुस्थानांत जरी चलनी नाणें म्हणून कायम राहिला तरी हिंदुस्थानाबाहेर त्याला किंमत राहिली नाहीं. सोनें मात्र अजूनही कायदेशीर नाणें मानलें गेलें नाहीं.

खाजगी रीतीनें लोकांचीं नाणीं पाडण्याचें सरकारी टांकसाळींनीं जेव्हां नाकारलें त्यावेळीं हुंडणावळीचा भाव १४॥ पेन्सपासून एकदम १६ पेन्सवर गेला; पण हा चढलेला भाव सट्टेबाजीच्या स्वरूपाचा असल्यामुळें तो तसाच टिकेल हें मात्र शक्य नव्हतें. सट्टे करणाऱ्याच्या हेतूनें लोकांनीं पुष्कळच चांदी हिंदुस्थानांत आणल्यामुळें व टांकसाळी बंद होण्याचे सुमारास लोकांनीं पुष्कळच रुपये पाडून घेतल्यामुळें १८९३ सालानंतर कांहीं वर्षे नवीन रुपये पाडण्याची सरकारास जरूर वाटली नाहीं. तरीपण देशांत चांदी मोठ्याच प्रमाणांत येत होती ह्याचें कारण असें कीं, हिंदुस्थानाच्या आयात मालापेक्षां निर्गत माल जास्त होता. पण अशी चांदी जास्त येईल अशी खुद्द स्टेट सेक्रेटरीचाही कल्पना नव्हती. ह्या चांदीचा उपयोग टांकसाळी बंद झाल्यामुळें दागदागिने करण्याकडे होऊं लागला. ह्यावेळीं परिस्थिति अशी होती कीं, टांकसाळी बंद झाल्यामुळें एक तोळा चांदीच्या किंमतीपेक्षां एक तोळा रुपयाच्या नाण्याची किंमत जास्त होती; व बाजार मंदी असल्यामुळें १५ आण्यांला एक तोळाभर चांदी विकत घेणें हा कदाचित् आंतबट्टयाचा व्यवहार होईल हें सामान्य माणसाला समजत नव्हतें. ज्यावेळीं दुर्दैवानें स्टेट सेक्रेटरीनें हुंड्या विकावयाचें तहकूब केलें त्याच वेळीं ही स्थिति निर्माण झाली. ह्यामुळें चांदीच्या खरेदीला ऊत आला. टांकसाळी बंद करण्याचे वेळीं दोन वाईट गोष्टी घडून आल्या:—पहिली गोष्ट म्हणजे स्टेट सेक्रेटरीनें आपल्या हुंड्या कमी प्रमाणांत विकण्याचें ठरविलें व सोन्याच्या किंमतीनें व्यक्त होणारा चांदीचा भाव खूपच उतरला.

(२९) **एका भ्रामक समजुतीचें निराकरणः**—ह्यावेळीं लोकांचा असा एक समज होता कीं, हुंडणावळीचा भाव उतरला म्हणजे निर्गत मालाची वाढ होते व त्यामुळें एकंदरींत देशाचा फायदाच होतो. अर्थशास्त्रांतलें हें तत्व सामान्यपणें खरें आहे. पण हें तत्व गुरुत्वकर्षणाच्या नियमाप्रमाणें

त्रिकालाबाधित आहे असें मानणें चुकीचें होईल. कधीं कधीं हुंडणावळीचा भाव उतरणें हें देशादेशांतल्या व्यापाराला नुकसानीचें असतें व बाहेरचा माल देशांत कमी प्रमाणांत येऊं लागतो. मुख्याची गोष्ट आपण जी विसरतों ती ही कीं, देशादेशांतला व्यापार म्हणजे विकाऊ मालांची नुसती अदलाबदल असून, जिन्नस उत्पन्न करण्यास लागणाऱ्या सापेक्ष किंमतीवर अवलंबून असतो. व त्या व्यापाराचा संबंध त्या देशांतल्या वस्तूंची किंमत ठरविण्याच्या प्रमाणावर बिलकूल नसतो. एकच माल एखाद्या देशांत उत्पन्न होण्यास जो खर्च लागतो तोच माल दुसऱ्या देशांत उत्पन्न होण्यास जर कमी खर्च लागेल तर त्या देशाला तो माल स्वस्त भावानें विकतां येईल. तेव्हां व्यापार हा जिनसा उत्पन्न करण्यास लागणाऱ्या सापेक्ष किंमतीवर अवलंबून असतो ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. अशा दृष्टीनें विचार केला असतां हिंदुस्तानचा निर्गत माल हुंडणावळीच्या दरावरच सर्वस्वीं अवलंबून नाहीं. येथें जो ताग किंवा चहा उत्पन्न होतो तसा ताग किंवा चहा इतर देशांत इतक्या स्वस्त किंमतींत होणें शक्य नाहीं. तेव्हां परदेशांची ह्या मालाला, तुमचा हुंडणावळीचा भाव कांहींही असो, मागणी असणारच व ह्या मालाबद्दल ते कापड, लोखंड, पोलाद वगैरे वस्तु ह्या देशांत जरूर पाठवितील. असो. ह्या वेळची परिस्थिति लक्ष्यांत घेतां ह्या उतरलेल्या हुंडणावळीच्या भावामुळें हिंदुस्तानाला परराष्ट्रीय व्यापारांत फारसा फायदा झाला नाहीं. कारण हुंडणावळीचा भाव उतरल्यामुळें जो कांहीं जास्त पैसे मिळून नफा व्हावयाचा तो नफा आयात मालाची किंमत जास्त द्यावी लागल्यामुळें उडून गेला. असो. सांगावयाचें तात्पर्य हें कीं, हुंडणावळीचा भाव स्थिर असला तरच देशास फायदा असतो; त्यामुळें देवीघेवींत व व्यापारांत अनिश्चितपणा रहात नाहीं व जमाखर्चाचें अंदाजपत्रक करण्यास सोयीचें असतें. हा भाव स्थिर नसल्यामुळेंच हिंदुस्तान सरकारला जादा कर बसवावे लागले व तो भाव स्थिर झाल्यावरही एकदां बसविलेले कर कमी करण्याचें सरकारच्या जिवावर येऊन लोकांस विनाकारण जास्त पैसे द्यावे लागत आहेत.

(३०) **फौलर कमेटीची नेमणूकः**--वर आपण पाहिलेंच आहे कीं, लोकांना नाणीं पाडून घेण्याकरतां टांकसाळी बंद झाल्यामुळें रुप्याची सोन्यांत

व्यक्त होणारी किंमत व त्याच रुप्याच्या बनलेल्या रुपयाची सरकारनें ठरविलेली किंमत ह्यांमध्यें बरीच तफावत पडूं लागली व प्रथम प्रथम रुपयांना मागणीही फारशी नव्हती व १८९३चा नाण्याचा कायदा पास होण्याच्या अगोदर व नंतर देशांत चांदी खूप आल्यामुळें पुढील कांहीं वर्षें लोकांच्या मागणीप्रमाणें रुपये पाडण्यांत आले नाहींत. तेव्हां सरकारला असा प्रश्न पडला कीं, १६ पेन्सच्या ऐवजीं १५ पेन्स सोनें घेऊन रुपये पाडून द्यावेत किंवा काय? दुर्दैवानें ह्याच वेळीं हिंदुस्थानांत दुष्काळ व प्लेग ह्यांनीं धुमाकूळ उडवून दिल्यामुळें हुंडणावळीवर त्याचा बराच परिणाम झाला; कारण स्टेट सेक्रेटरीनें आपल्या हुंड्या विकण्याचें तहकूब केलें व दुष्काळग्रस्त लोकांना मदत करण्याकरतां म्हणून सरकाराला खजिन्यांतून पैसे काढावे लागले. ह्याचा एकंदर परिणाम असा झाला कीं, बाजारांत पैशाची चणचण फार भासूं लागली. पण ही स्थिति लवकरच बदलली. १८९८ सालीं चोहोंकडे सुबत्ता होऊन पुनः रुपयांना जास्त मागणी येऊं लागली. हिंदुस्थानांत १ साव्हरीनला १५ रुपये मिळतात म्हणून सोनें पाठविणें फायदेशीर होऊं लागलें व हुंडणावळीचा भाव १६ पेन्सच्या खालीं उतरणें किंवा वर चढणें अशक्य झालें.

१८९७ सालीं सेक्रेटरी आफ् स्टेटनें हिंदुस्थान सरकाराला असें विचारलें कीं, जर फ्रान्स व अमेरिका ह्यांनीं सोनें व चांदी ह्या धातूंच्या नाण्याकरितां आपल्या टांकसाळी खुल्या ठेविल्या तर तुम्ही लोकांना चांदी घेऊन रुपये पाडून देण्याकरितां आपल्या टांकसाळी खुल्या ठेवाल काय? ह्या प्रश्नाला हिंदुस्थान सरकारनें असें उत्तर दिलें कीं, ज्या अर्थी इतर राष्ट्रांवर अवलंबून न राहतां स्वतंत्रपणें हुंडणावळीच्या भावांत स्थिरपणा आपणास आणतां येत आहे त्या अर्थी टांकसाळी पूर्ववत् खुल्या ठेवणें इष्ट होणार नाहीं. अतएव फ्रान्स व अमेरिका ह्या राष्ट्रांची विनंति नाकारण्यांत यावी. त्याच वेळीं मुंबई, मद्रास व कलकत्ता ह्या ठिकाणच्या व्यापारी संघांनीं जोराचा उठाव केल्यामुळें १८९८ च्या मार्च महिन्यांत हिंदुस्थान सरकारनें एक खलिता स्टेट सेक्रेटरी साहेबांस लिहिला व त्यांत अशा सूचना केल्या कीं, (१) कर्ज काढून एक सुवर्णनिधि तयार

करावा; ( २ ) देशांत खेळत असलेले रुपये काढून घेऊन रुपयाचा भाव १६ पेन्स कायम ठेवण्याकरितां ते आटवावेत व ( ३ ) ह्या आटविलेल्या रुपयांतून जी चांदी मिळेल ती विकून सुवर्णनिधि वाढवावा. ह्या सूचनांचा इत्यर्थ एवढाच होता कीं, रुपये प्रचारांतून काढून घेऊन त्यांची किंमत वाढवावयाची व रुपयास १६ पेन्स हा भाव कायम ठेवण्याकरितां ह्याच भावानें ह्या सुवर्णनिधींतून लागेल तितकें सोनें रुपयाचे बदलीं द्यावयाचें. त्याच महिन्यांत दुसरा एक खलिता हिंदुस्थान सरकारनें स्टेट सेक्रेटरीकडे पाठविला. त्यांत त्यानें असें स्पष्ट कळविलें कीं, हिंदुस्थानांत रुपयाचें नाणें सुरू करण्याची आपली इच्छा नाहीं; व तुम्हाला जर लोकांचीं मतें मागवावयाचीं असतील तर ह्या देशांत कोणतें नाणें सुरू करावें ह्या मुद्यावर न मागवितां सोन्याचेंच नाणें सुरू करण्याकरितां कोणते उपाय अधिक यशस्वी होतील ह्या मुद्यावर तीं मतें तुम्ही मागवा. एखादी कमिटी जरी तुमच्याकडून नेमण्यांत आली तरी आपली हरकत नाहीं; पण अशी कमिटी नेमल्यानें व्यर्थ कालातिपात होतो.

हा खलिता पोंचावयाच्या अगोदरच स्टेट सेक्रेटरीनें **फौलर** कमिटी नेमून तिला असें कळविलें कीं, हिंदुस्थान सरकारनें केलेल्या सूचना किंवा त्या विषयाला धरून इतर आनुषंगिक प्रश्न व हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या चलनपद्धति इतक्या प्रश्नांवर कमिटीनें आपला रिपोर्ट लिहावा. ह्या वेळीं कमिटीसमोर अनेक महत्त्वाचे प्रश्न विचाराकरितां आलेले होते; व ह्या चलनी नाण्याच्या प्रश्नावर बरेच पक्ष तयार झालेले होते. एक पक्ष असें म्हणत असे कीं, हिंदुस्थानांत ज्या अर्थी रुपयाच्या नाण्याकरितां टांकसाळी बंद झालेल्या आहेत त्या अर्थी सोन्याचेंच नाणें सुरू करण्यांत यावें; कारण त्यामुळें हुंडणावळीचा भाव स्थिर राहून व्यापाराची भरभराट होईल व हुंडणावळीचा भाव कमीजास्त झाल्यामुळें सरकारला सोसावें लागणारें नुकसान थांबेल व हिंदुस्थान व इतर प्रमुख राष्ट्रें ह्यांमध्यें जर एकच धातूचें नाणें असेल तर त्यामुळें व्यापाराची जास्त सोय होईल. ह्या पक्षाला विरोध करणाऱ्या पक्षाचें असें म्हणणें होतें कीं, हिंदुस्थानांत चांदीचें एकच नाणें असणें इष्ट आहे; कारण आजपर्यंत हें नाणें हिंदुस्थानास फायदेशीर झालें आहे व त्यामुळें किंमती स्थिर झालेल्या आहेत.

तसेंच हिंदुस्थानाप्रीत्यर्थ विलायतेंत जो खर्च होतो तो जर कमी केला व हिंदुस्थान सरकारच्या राज्यकारभारांत जर काटकसर करण्यांत आली तर हुंडणावळीचा प्रश्न सोडविणें सोपें जाईल. शिवाय हुंडणावळीचा भाव जर उतरला तर त्यामुळें निर्गत माल स्वस्त होऊन देशाची भरभराट होईल. ह्या पक्षाचा सर्वांत महत्वाचा मुद्दा असा होता कीं, होतां होईल तों सरकारनें कृत्रिम चलनी नाणें सुरू करूं नये. कारण अशा कृत्रिम नाण्यानें पूर्वी जें नुकसान सरकार सोशित असें तें आतां लोकांच्या शिरावर पडून ते चिरडले जातील.

**( ३१ ) मि. लिंडसेची सूचना:**—ह्या कमिटीसमोर इतर तज्ज्ञांच्याही कांहीं सूचना होत्या. त्यांपैकीं लिंडसेसाहेबानें केलेली एक योजना विचार करण्यासारखी होती. ह्या योजनेचा मतलब असा होता कीं, एक सुवर्णनिधि निर्माण करण्यांत यावा व त्याचें नांव ‘ गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह ’ असें ठेवण्यांत यावें. तो मुख्यतः लंडनमध्यें ठेवण्यांत यावा; पण ह्या निधीचा कांहीं भाग मुंबई व कलकत्ता ह्या शहरीं रुपयांचे रुपानें ठेवण्यांत यावा. एक कोट पौंडचें १५ वर्षांच्या मुदतीचें लंडनमध्यें कर्ज काढण्यांत यावें; तें इंडिया ऑफिस किंवा इंग्लंडच्या बँकेत ठेवण्यांत यावें व लोकांना असें जाहीर करण्यांत यावें कीं, ज्या लोकांना १५,००० रुपये किंवा त्यांहून जास्त रुपयांच्या हुंड्या पौंडाच्या बद्दला एक रुपायास १६ $\frac{१}{१६}$ पेन्स ह्या दरानें हव्या असतील त्यांना ह्या सुवर्णनिधि ऑफिसांतून विकण्यांत येतील व जे लोक ह्या हुंड्या विकत घेतील त्यांना त्या मुंबई किंवा कलकत्ता येथील चलनी नोटांच्या ऑफिसांत किंवा हिंदुस्थानांतल्या टांकसाळीच्या हपीसांत पटवून रुपये घेतां येतील. लिंडसेच्या मतानें रुपयांच्या हुंड्या १५ हजार रुपयांपेक्षां कमी रुपयांकरितां नसाव्या व एक हजार पौंडांहून कमी पौंडांकरतां नसाव्या. त्याचप्रमाणें हुंडणावळीचा जास्तींत जास्त दर १६ $\frac{१}{१६}$ पेन्स व किमान दर १५ $\frac{३}{४}$ पेन्स असावा. तसेंच ज्या अर्थी ह्या हुंड्यांची मागणी मुख्यतः प्रेसिडेन्सी बँकांकडूनच होणार व ह्याच बँकांत एक्सचेंज बँकांतल्या शिलका असणार त्या अर्थी सुवर्णनिधीमध्यें १ कोट पौंड ठेवले असतां पुरे होतील. ज्यावेळीं हुंडणावळीचा दर १६ $\frac{१}{१६}$ पेन्स होईल त्यावेळीं ( आणि हा

दर इतका कमी असेल कीं, त्यामुळें रुपये पाडण्याकरितां हिंदुस्थानांत सोनें पाठविण्याचा मोह लोकांस फारसा होणार नाहीं ) इंग्लंडची बँक ही रुपयांच्याही हुंड्या विकावयास काढील व व्यापाऱ्यांना येथें खजिन्यावर रुपये मिळूं लागतील. ह्याचा असा परिणाम होईल कीं, सोन्याचीं नाणीं हिंदुस्थानांत बाहेरून प्रत्यक्ष न येतां रुपयांचा प्रसार येथें जास्त वाढून व्यापाऱ्यांचें काम भागेल. तसेंच ज्या-वेळीं हिंदुस्थानांतून बाहेर माल पाठविणाऱ्या व्यापाराला पैसे पाठवावयाचे असतील तेव्हां त्यानें १५$\frac{3}{4}$ पेन्स ह्या दरानें हुंड्या विकत घेऊन त्या इंग्लंडमध्यें पटविल्या म्हणजे त्यांचेंही काम भागेल. लिंडसेचें म्हणणें असें होतें कीं, हिंदु-स्थानांत सोन्याच्या चलनी नाण्याची बिलकूल जरूर नाहीं. कारण येथें रुपयांतच लोकांचा व्यवहार होत असतो, तेव्हां आपण येथें रुपये भरले असतां आपणांस सोनें लंडनमध्यें मिळतें किंवा लंडन येथें सोनें दिलें असतां येथें आपणांस रुपये मिळतात. असा लोकांस भरंवसा आला (व असा भरंवसा विलायतेंत सुवर्णनिधि ठेवला असतां सहज उत्पन्न करितां येईल ) तर सोन्याच्या चलनी नाण्याची जरूरी बिलकूल भासणार नाहीं व रुपयाची किंमतही स्थिरावेल.

ह्या लिंडसेसाहेबाच्या योजनेला खुद्द हिंदुस्थान सरकार विरुद्ध होतें. ह्या सरकारचें म्हणणें असें होतें कीं, तुम्हांला जर लोकांमध्यें तुमच्या नाण्याबद्दल विश्वास उत्पन्न करावयाचा असेल तर ज्या देशांत ते लोक रहातात त्याच देशांत तुम्हाला सुवर्णनिधि ठेवला पाहिजे; पण ह्या योजनेप्रमाणें ज्या लोकांत विश्वास उत्पन्न करावयाचा ते लोक रहाणार हिंदुस्थांत व सुवर्णनिधि असणार विलाय-तेंत. दुसरा मुद्दा असा कीं, ह्या योजनेप्रमाणें चालल्यास सरकारास हुंड-णावळीमुळें उत्पन्न होणाऱ्या परिस्थितीवर बिलकूल ताबा ठेवितां येणार नाहीं. ह्यावर लिंडसेचें असें म्हणणें होतें कीं, हिंदुस्थानांत लोकांचें काम रुपयांनीं भागतच आहे. सोन्याची खरी जरूरी विलायतेंतच भासणार. हिंदुस्थानांत जर हा सुवर्णनिधि ठेवला तर तो त्यांतील सोनें सांठविण्यांत किंवा दागदागिने कर-ण्यांतच फस्त होऊन जाईल. कांहीं कारणानें सोनें सुवर्णनिधींतून काढून घेण्यांत आलें तर, तेंच सोनें विलायतेमध्यें असल्यास तर ताबडतोब नवीन सोन्याची भरती

त्या निधीमध्यें करतां येईल. शिवाय ही योजना सुचविण्यांत मुख्य हेतु असा आहे कीं, सोन्याचा उपयोग चलनी नाणी पाडण्यांत न करितां एखादे वेळीं हिंदुस्थानांत निर्गत मालापेक्षां आयात माल जर जास्त आला व त्यामुळें ह्या देशाला जर देणें जास्त झालें तर तें फेडण्यांत व्हावा. अशा वेळीं हिंदुस्थानांत सोनें आणून पुनः परत विलायतेंत पाठविणें म्हणजे नुस्ता द्रव्याचा व कालाचा अपव्यय होय. दुसऱ्या मुद्यावर त्यानें असें उत्तर दिलें कीं, आपल्या योजनेचा हाच विशेष आहे कीं, त्या योजनेंत सरकारला ढवळाढवळ करतां येऊं नये. सोन्याचें चलनी नाणें व सुवर्णपरिमाणपद्धति सुरू करून जें काम होईल तेंच काम आपल्या योजनेप्रमाणें चालल्यास सोन्याच्या चलनी नाण्याशिवाय नुसत्या सोन्यानें वस्तूंची किंमत ठरविण्याच्या पद्धतीनेंच होईल.

इतक्या विस्तारानें ह्या योजनेचा विचार करण्याचें असें कारण आहे कीं, हीच योजना पुढें, सरकारनें प्रथम जरी विरोध दर्शविला तरी, त्यानें नकळत स्वीकारली व हीच योजना हल्लीं प्रचलित आहे. असो. तूर्त तरी*फौलर कमेटीनें ही योजना त्याज्य म्हणून ठरविली व त्याबद्दल असें कारण सांगितलें कीं, ही योजना जर स्वीकारण्यांत आली तर हिंदुस्थानला लागणारें भांडवल बाहेरून येथें मिळणार नाहीं. तसेंच हीच योजना कायम व्हावयाची असेल तर हिंदुस्थानांतील सुवर्णचलनपद्धतीला नेहमींच इंग्लंडमध्यें ठेवलेल्या सुवर्णनिधीमधल्या पौंडावर (व हे पौंड हिंदुस्थानाच्या मानानें पुरेसे आहेत असें मानतां येत नाहीं ) अवलंबून रहावें लागणार व हिंदुस्थान सरकारला जे रुपये येथें स्वीकारले जातील त्या रुपयांबद्दल विलायतेंत सोनें पुरविण्याची अमर्याद जबाबदारी स्वीकारावी लागणार. शिवाय हिंदु लोकांची सोन्याचा गुप्तसंचय करण्याची संवय इतकी कांहीं भयंकर नाहीं कीं, तिजमुळें ह्या देशांत सोन्याचें नाणें कधींही सुरू करण्यांत येऊं नये.

**३२. फौलर कमेटीनें केलेल्या सूचनाः**-फौलरकमेटीनें आपला रिपोर्ट १८९९ च्या जुलै महिन्यांत सादर केला व त्या रिपोर्टमध्यें खालील सूचना केल्याः—

* टीपः—कमेटीचें हें मत वाचकांनीं मुद्दाम लक्षांत ठेवावें.

(१) इंग्रजी साव्हरिन नाणें हिंदुस्थानांत कायदेशीर मानलें जाऊन तें प्रचलित करण्यांत यावें.

(२) त्याचप्रमाणें रुपया हेंही नाणें अमर्याद प्रमाणांत कायदेशीर मानण्यांत यावें.

(३) रुपयाची किंमत १६ पेन्स मानण्यांत यावी.

(४) सोन्याचें नाणें बिनशर्त पाडण्याकरितां हिंदुस्थानांतल्या टांकसाळी खुल्या रहाव्यात. पण चांदीच्या नाण्याच्या बाबतींत मात्र सरकारच्याच नाण्याकरितां त्या खुल्या असाव्या.

(५) रुपये घेऊन सोनें देण्याचे बाबतींत सरकारनें कोठलीही जबाबदारी आपल्या अंगावर घेऊं नये. सोनें घेऊन रुपये देण्याचो आपली वहिवाट सरकारनें चालू ठेवावी; पण लोकांच्या गरजांपेक्षां सोनें प्रचारांत जास्त आहे अशी खात्री पटल्याशिवाय सरकारनें नवीन रुपये पाडूं नयेत.

(६) रुपये पाडतांना सरकारास जो फायदा होतो तो फायदा त्यानें आपला जादा वसूल असें न मानितां किंवा आपल्या नेहमींच्या शिलकेचा तो एक भाग आहे असें न समजतां तो सोन्याच्या रूपानें अलग काढून ठेवावा. ज्या वेळीं हुंडणावळीचा भाव १५$\frac{3}{4}$ पेन्सपेक्षां कमी होऊं लागेल त्या वेळीं विलायतेंत सोनें पाठविण्यांत ह्या राखून ठेवलेल्या सोन्याचा उपयोग करण्यांत यावा.

ह्या सर्व सूचनांवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं, फौलर कमेटीचे मनांत हिंदुस्थानांत सोन्याचें चलनी नाणें व 'सुवर्णपरिमाण पद्धति' (गोल्ड स्टँडर्ड) हीं दोन्ही सुरू करून फ्रान्स देशातील चलनीपद्धति प्रमाणें येथील चलनीपद्धति सुरू करावयाची होती. ह्याचा असा परिणाम झाला असता कीं, रुपया व साव्हरिन ह्यांत चढाओढ सुरू झाली असती. हा रिपोर्ट प्रसिद्ध झल्यावर हिंदुस्थान सरकारनें कमेटीच्या सूचना अंमलांत आणण्याचें ठरविलें व एक कायदा पास करून घेतला. ह्या कायद्यान्वयें एका साव्हरिनास १५ रुपये व अर्ध्या साव्हरिनास ७॥ रुपये अशा दरानें ते सुरू करण्यांत आले व त्या नाण्याचे मोबदला चलनी नोटा काढण्याचें ठरविण्यांत आलें. त्याचप्रमाणें सोन्याच्या नाण्याला कायदेशीर संमति मिळून तें बऱ्याच प्रमाणांत प्रचारांत आणण्यांत आलें.

# भाग ४ था.

## विसाव्या शतकाच्या प्रारंभींची चलनपद्धति.

**३३. सुवर्णविनिमय परिमाणपद्धती'चा प्रारंभः—** पण हळू हळू हिंदुस्थान सरकारचें धोरण फौलर कमेटीनें आखून दिलेल्या धोरणापासून अलग होऊं लागलें. हिंदुस्थानांत रुपये पाडण्यापासून होणारा फायदा विलायतेमध्यें सुवर्णनिधीच्या नांवानें सरकारी नोटा वगैरेमध्यें अडकावून ठेवणें; सोन्याचीं नाणीं पाडण्याकरितां टांकसाळ सुरू करण्याचें टाळणें; हुंडणावळीचा दर १५$\frac{3}{4}$ पेन्सपेक्षां कमी झाला असतांना हुंड्या विकावयास काढणें; सुवर्ण गंगाजळीची चांदीची शाखा स्थापन करणें; त्याचप्रमाणें ह्याच गंगाजळींतून रेल्वेला वगैरे लागणाऱ्या भांडवलाकरितां व यथील सरकारनें स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या विकल्या असतां त्या हुंडया घेऊन येणाऱ्या खाजगी व्यापाऱ्यांना देण्याकरितां सोन्याचा उपयोग करणें ही सर्व कृत्यें सरकारच्या फौलर कमेटीचें धोरण बदलवून टाकण्याच्या निश्चयाचें दर्शक होत. फौलर कमेटीच्या मनांत हिंदुस्थानांत सुवर्णपरिमाणपद्धति (गोल्ड स्टँडर्ड) व सोनेरी चलनी नाणें हीं दोन्ही सुरू करावयाचीं होतीं. पण पुढें पुढें हें धोरण सुटून गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड ही नवीनच चलनपद्धति सुरू करण्यांत आली. ही पद्धत लिंडसेनें सुचविलेल्या योजनेबरहुकूम होती. ह्या पद्धतीनें हिंदुस्थानांत जरी सोन्याचीं नाणीं प्रचलित असलीं तरी मुख्य नाणें चांदीचें असतें व विलायतच्या व्यापाऱ्यांना द्यावयाचे वेळीं सोन्याच्या नाण्याचा उपयोग करावयाचा असतो. हिंदुस्थानांत अमर्याद प्रमाणांत रुपयाचें नाणें कायदेशीर मानिलेलें आहे व हें नाणें सोन्याच्या नाण्यांत पटविण्याची सरकारावर जबाबदारी नसते. सोनें व रुपया ह्यांचा संबंध सरकार ठरवील तो असतो व त्या रुपयांत असलेल्या चांदीच्या किंमतीशीं त्याचा बिलकूल संबंध नसतो. सरकारनें ज्या चलनी नोटा सुरू केलेल्या असतात त्याबद्दल रुपयेच लोकांना मिळू शकतात. सरकावर एवढीच

जबाबदारी असते कीं, सोन्याबद्दल ठराविक दरानें कृत्रिम किंमतीचे रुपये लोकांना द्यावयाचे व ज्यावेळीं रुपयाचा हुंडणावळीचा भाव उतरेल त्यावेळीं विलायतेच्या व्यापाऱ्यांना सोनें पुरवावयाचें. रुपयाची कृत्रिम किंमत चांदीच्या मूळ किंमतीपेक्षां ( Intrinsic value ) जास्त ठरविली असल्या कारणानें जो नफा सरकारास होतो त्या नफ्याचीच विलायतेंत सोन्याची गंगाजळी ठेवण्यांत येते.

अशा प्रकारचें हें गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड 'न हिंदु न यवनः' अशा पद्धतीचें आहे. पण ह्या धेडगुजरी चलनी पद्धतीची केनीस व स्पॉल्डिंगसारख्या अर्थशास्त्रज्ञांनीं व इतर इंग्रजी मुत्सद्यांनीं मनमुराद स्तुति केलेली आहे. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, जेव्हां एखादी वस्तू चांगली असते तेव्हांच त्या वस्तूची नक्कल इतरत्र होत असते. ज्या अर्थी हिंदुस्थानांत प्रचलित असलेली चलन-पद्धति फिलिपाइन बेटें, मेक्सिको व जपानसारख्या देशांत सुरू करण्यांत येते त्याअर्थी ही पद्धति चांगली आहे ह्याबद्दल निराळा पुरावा नको. ह्या लोकांचे मतानें ह्या पद्धतीचा विशेष असा आहे कीं, तिजमुळें देशांतल्यादेशांत लोकांचा व्यवहार चांदीचीं नाणीं व चलनी नोटा ह्यांवर भागून सोन्याची काटकसर करतां येते; व ज्यावेळीं परदेशांत सोनें पाठवावयाचें असतें त्यावेळीं तें मुबलक पाठवितां येतें. इंग्लंडसारख्या सुधारलेल्या राष्ट्रांत सुद्धां एकंदर सर्व चलनी नाण्यांचा विचार केला असतां सोन्याचा उपयोग नाण्याचे कामीं फारच थोड्या प्रमाणांत करण्यांत येतो. अशा दृष्टीनें विचार केला असतां हिंदुस्था-नांतील ही पद्धति खरोखरच इतर राष्ट्रांस आदर्शवत आहे. हें म्हणणें कितपत सयुक्तिक आहे ह्याचा आपण पुढें विचार करूं.

( ३४ ) **सुवर्णगंगाजळी ठेव:**—वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, फौलर कमिटीच्या मनांत हिंदुस्थानांत सोन्याचें चलनी नाणें जारीनें सुरू करावयाचें होतें. ह्या धोरणानुसार हिंदुस्थानसरकारनें साव्हरिन व अर्धा साव्हरिन प्रचारांत आणण्याची नेटानें खटपट केली; पण तो प्रयत्न सर्वस्वीं फसला. १८९९ सालीं चलनी नोटा २७ कोटी रुपयांच्या प्रचारांत होत्या व ह्या नोटांकरितां

जो निधि राखून ठेवण्यांत आला त्यांत १० कोटींचे सरकारी रोखे वगैरे होते व १७ कोटींचीं नाणीं व सोनें होतें. सरकारला असें वाटलें कीं, ९॥ कोटींचे रुपये राखून ठेवले असतां काम भागेल व ७॥ कोटींचें सोनें ठेवलें असतांना जो कोणी नोटा घेऊन येईल त्याला सोन्याचे साव्हरीन देण्यांत येतील. पण सरकारला लवकरच असा अनुभव आला कीं, जितके साव्हरिन लोकांमध्यें प्रचलित करण्याचा प्रयत्न करावा तितके साव्हरिन पुनः खजिन्यांत परत येऊं लागतात व प्रत्येक वेळीं लोक नोटा घेऊन खजिन्यांत आले असतां रुपयेच मागतात. तेव्हां सरकारनें असें ठरविलें कीं, साव्हरिन फारसे प्रचारांत न आणतां खजिन्यांत रुपयांचाच भरणा जास्त करावयाचा. कारण सोन्याच्या नाण्यांत रुपयाला हांकून देण्याची धमक नाहीं व लोकांचें रुपयांवर फारच प्रेम आहे; कारण तो जवळ जवळ ४०० वर्षें प्रचारांत आहे. तेव्हां परिस्थिति अशी प्राप्त झाली कीं, सरकारला लिंडसेसाहेबानें केलेल्या योजनेचा न कळत पुरस्कार करावा लागला. फरक एवढाच कीं, लिंडसेचें म्हणणें आणीबाणीच्या वेळीं कर्ज काढून गंगाजळी निर्माण करावी तर सरकारनें अशा कर्जावर भिस्त न ठेवतां एक रुपयामागें ५ आणे नफा मिळवून जो कांहीं संचय केलेला होता त्यापासूनच ती ठेव निर्माण करण्याचें ठरविलें.

वर सांगितल्याप्रमाणें सरकारला अनुभव आलाच होता कीं, हिंदुस्थानांत खजिन्यामध्यें विवक्षित किंमतीच्या सोन्यानंतर शिलकींत रुपयेच जास्त राखून ठेवले पाहिजेत व सोनें सांठवून ठेवण्यापेक्षां चांदीच पुरेशी राखून ठेवली पाहिजे व आपल्याला जर हुंडणावळीचा भाव स्थिर ठेवावयाचा असेल तर एक निराळाच निधि निर्माण केला पाहिजे. सर एडवर्डलॉ ह्यानें एक खलिता सेक्रेटरी ऑफ् स्टेटकडे पाठवून दिला; त्यांत त्यानें तीन मुख्य सूचना केल्या; पहिली सूचना अशी कीं, हिंदुस्थानांत चलनी नोटा खजिन्यांत जेव्हां आणल्या जातात तेव्हां लोकांना रुपयांचीच अपेक्षा असते, तेव्हां हिंदुस्थानच्या खजिन्यांत चलनी नोटांकरितां राखून ठेवलेल्या निधीमध्यें ७० लाख साव्हरिन ठेवले असतां काम भागणार आहे म्हणून ह्या रकमेहून जास्त रकम ठेवण्याचें कारण नाहीं. दुसरी सूचना अशी कीं, ह्या रकमेहून जास्त रकम

जेव्हां सांचेल तेव्हां त्या जादा रकमेचा चांदी विकत घेण्याकडे विनियोग करावा व तिसरी सूचना अशी कीं, रुपयांचीं नाणीं पाडतांना सरकारास जो नफा होतो त्या नफ्याचा विनियोग ह्या चलनी नोटाप्रीत्यर्थ लागणाऱ्या निधी• व्यतिरिक्त एक गंगाजळी ठेव निर्माण करण्यांत यावी. ह्या तिन्ही सूचनांचा सेक्रेटरी आफ् स्टेटनें स्वीकार केला व अशा रीतीनें सुवर्णविनिमयपरिमाण-पद्धति व सुवर्णगंगाजळी ठेव (गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह) ह्यांचा पाया ह्या खालितयामुळें घातला गेला. हिंदुस्थान सरकारची अशी इच्छा होती कीं, ही गंगाजळी ठेव हिंदुस्थानांतच आपल्या ताब्यांत असावी; पण स्टेट सेक्रेटरीच्या आग्रहावरून ती विलायतेंतच ठेवण्यांत आली. अशा रीतीनें फौलर कमिटीच्या सूचनेविरुद्ध ह्या गंगाजळीची प्राणप्रतिष्ठा विलायतेंत झाल्यामुळें हिंदुस्थानच्या व्यापाऱ्यांचा तोटा होत आहे.

प्रथम प्रथम सरकारास रुपयांवर जो नफा होत असे त्याचें सोनें घेऊन तें विलायतेंत पाठविलें जाई व हें सोनें चलनी नोटांच्या निधींतून काढलें जाई. पण पुढें पुढें १९०५ पासून हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराला आर्थिक मदत करण्याकरितां म्हणजे हिंदुस्थानांत पैसे पाठवूं इच्छिणाऱ्या विलायतेच्या व्यापाऱ्यांची सोय करण्याकरितां स्टेट सेक्रेटरीकडून हुंड्या विकण्याची पद्धत सुरु झाली. ह्या पद्धतीपासून असा फायदा होऊं लागला कीं, हिंदुस्थान-सरकारला विलायतेंत सोनें बिनखर्चानें पाठवितां येऊं लागलें. ज्या विलायतच्या व्यापाऱ्यांना हिंदुस्थानांत पैसे पाठवावयाचे असतील त्यांनीं स्टेट सेक्रेटरीनें विकण्यास काढलेल्या हुंड्या (कौन्सिल बिल) विकत घेऊन तेथें सोन्याच्या रूपानें पैसे भरावे व त्या विकत घेतलेल्या हुंड्या ज्या व्यापाऱ्यांस हिंदुस्थानांत पैसे द्यावयाचे असतील त्या व्यापाऱ्यांकडे पाठवून द्याव्या व त्या व्यापाऱ्यांनीं खजिन्यांत त्या हुंड्या पटवून रुपये घेऊन जावे. ह्या हुंड्या विकावयाला काढल्यानें स्टेट सेक्रेटरीला एक नवीन उत्पन्नाची बाब मिळाली. कारण पूर्वी विलायतचे व्यापारी इकडे सोनें पाठवीत असतांना त्यांना विमा उतरण्याचा वगैरे जो खर्च येई तो थोडा कमी का होईना पण आतां ते स्टेट सेक्रेटरीला त्यानें काढिलेल्या हुंड्या

विकत घेऊन देऊं लागले. १९०४ सालापासून १९१७ सालापर्यंत स्टेट सेक्रेटरी आपलीं बिलें किंवा हुंडया १ रुपयास १६$\frac{1}{8}$ पेन्स ह्या भावानें विकत आलेला आहे. ज्या वेळीं हिंदुस्थानांत चांदीची जरूर असेल त्यावेळीं स्टेट सेक्रेटरी विलायतेंत चांदी खरेदी करून ती इकडे पाठवून देत असतो. एखादे वेळीं हिंदुस्थानांत साव्हरीन वाजवींहून जास्त प्रमाणांत जमूं लागले म्हणजे महायुद्धाचेपूर्वी अशी चाल होती कीं, आस्ट्रेलिया किंवा इजिप्त ह्या देशांतून हिंदुस्थानांत जे साव्हरिन पाठविलेले असतात त्यावरच १ रुपयास १६ पेन्स किंवा फार तर १६$\frac{1}{32}$ पेन्स ह्या दरानें टेलिग्रॅफिक ट्रॅन्सफर (तारेच्या हुंड्या) विकावयास काढल्या जात; व हा दर असा असे कीं, त्यामुळें हिंदुस्तानांत साव्हरिन पाठविण्यापेक्षां ते विलायतेंत पाठविणेंच जास्त फायदेशीर होई. असो. १९०५ सालापासून हिंदुस्तान सरकारला विलायतेंत सोनें पाठविण्याचा प्रसंग फारसा आलेला नाहीं. जेव्हां स्टेट सेक्रेटरीला सोन्याची जरूरी भासते तेव्हां तो आपल्या हुंड्या विकावयास काढून आपली सोन्याची भरती करून घेत असतो.

(३५) **ह्या ठेवीसंबंधानें सामान्य चर्चा**:—अशा स्वरूपाची ही गंगाजळी ठेव आहे. गंगाजळी ठेवीचा कांहीं भाग चलनी नोटांच्याप्रीत्यर्थ राखून ठेवलेल्या निधीमध्यें ठेवलेला असतो व मुख्य भागाला गोल्ड स्टॅंडर्ड रिझर्व्ह असें नांव देण्यांत आलेलें आहे. ह्या ठेवीचा कांहीं भाग सरकारी रोख्यांच्या रुपानें असतां कांहीं भाग विलायतेंत थोड्या मुदतीनें कर्ज म्हणून खर्च केलेला असतो; कांहीं भाग सोन्याच्या रूपानें बॅंक आफ् इंग्लंडमध्यें ठेवलेला असतो व कांहीं भाग हिंदुस्तानांत चांदीचे रुपानें ठेवलेला असतो.

ह्या गंगाजळी ठेवीसंबधानें विचार करीत असतांना खालील प्रश्न आपल्या समोर प्रामुख्यानें येतातः-(१) ह्या ठेवीचा उद्देश काय? म्हणजे ही कशाकरितां निर्माण करण्यांत आली? (२) कोणत्या रूपांत ही ठेवण्यांत यावी? (३) ती कोठें ठेवण्यांत यावी? (४) तिची वाढ कोठपर्यंत होऊं द्यावी? ह्या प्रश्नांपैकीं कांहीं प्रश्नांचें उत्तर वर आलेलेंच आहे. मुख्यतः दुसऱ्या व तिसऱ्या प्रश्नांवरच लोकमत सरकाराविरुद्ध आहे. लोकांचें असें म्हणणें आहे कीं, ज्याअर्थी हुंडणा-

वळीचा भाव स्थिर रहावा म्हणून ही ठेव निर्माण करण्यांत आलेली आहे व ज्या लोकांत सरकारच्या कृत्रिम किंमतीच्या नाण्याबद्दल विश्वास उत्पन्न करावयाचा ते लोक जर हिंदुस्तानांत आहेत तर ही गंगाजळी ठेव येथेंच ठेवण्यांत आली पाहिजे. त्याचप्रमाणें आणीबाणीच्यावेळीं जर सरकाराला जरूर लागली तर त्यावेळीं ह्या ठेवींची मदत होऊं शकत नाहीं. कारण ह्या ठेवींचा निम्याहून अधिक भाग सरकारी रोख्यांत अडकून ठेवलेला असतो व ते रोखे जर एकदम विकावयाला काढले तर कमी किंमतीला विकावे लागून त्यापासून लाखों रुपयांचें नुकसान होतें. त्याचप्रमाणें ह्या सुवर्णनिधीला तुम्ही जर गंगाजळी ठेव हें नांव देणार तर हुंडणावळीचा भाव स्थिर करण्याव्यतिरिक्त इतर कोणच्याही कामाकडे ह्या ठेवीचा उपयोग करतां कामा नये; परंतु वस्तुस्थिती पहावी तों स्टेट सेक्रेटरीला रेल्वेसारख्या संस्थांत सामान खरेदी करण्यांकरितां ह्या ठेवीचा विनियोग करण्याचा मोह आवरत नाहीं. ही ठेव वास्तविक हिंदुस्तानच्या लोकांच्या निढळाच्या घामापासून उत्पन्न झाली आहे व त्या ठेवीचा उपयोग हिंदुस्तानच्या व्यापाऱ्यांसच झाला पाहिजे; पण मौज अशी कीं, हे व्यापारी चांगले व्याज देत असतांना त्यांना ठेवींतून पैसे मिळत नाहींत. पण विलायतच्या व्यापाऱ्यांना थोड्या व्याजानें हिंदुस्तानची रकम वापरावयास मिळत आहे. 'चाकरास मलीदा व धन्याला धत्तुरा' ह्या म्हणीचें हें उत्कृष्ठ उदाहरण आहे. तसेंच ह्या ठेवीला जर सुवर्णगंगाजळीठेव असें नांव द्यावयाचें तर त्या ठेवीत चांदी किंवा कागदी रोखे कां असावेत हें समजणें जरा कठिणच आहे. आतां एका मुद्याचा विचार करून हा ठेवीचा विषय संपवूं. तो मुद्दा हा कीं, त्या ठेवींत किती किंमतीचें सोनें ठेवावें? १९१३ सालीं चेंबरलेन कमिशन नेमण्यांत आलें. त्या कमिशनसमोर ह्या ठेवीबद्दल बरेच प्रश्न विचारार्थ ठेवले गेले होते. त्या प्रश्नांपैकीं हा एक प्रश्न होता. कमिशननें आपलें मत असें दिलें कीं, ह्या ठेवींत किती सोनें ठेवावें हें ठरविणें कठिण आहे. ह्या ठेवीचा उद्देश असा

¶ महायुद्ध सुरू झाल्यावर ही चांदी काढून त्याबदलीं सोनें ठेवण्यांत आलेलें आहे.

आहे कीं, ज्या वेळीं स्टेट सेक्रेटरीला आपल्या हुंड्या कायदेशीर रीतीनें विकणें अशक्य होईल किंवा हिंदुस्तानचा आयात माल निर्गत मालापेक्षां जास्त होऊन ह्या देशाला परदेशच्या व्यापाऱ्यांस सोनें पाठवावें लागेल अशा वेळीं ह्या गंगाजळी ठेवीचा उपयोग करण्यांत यावा. ज्या ज्या वेळीं हिंदुस्तानांतल्या लोकांना प्रचलित असलेल्या रुपयांबदली साव्हरिन हवे असतील त्या त्या वेळीं त्यांना ते साव्हरिन पुरवणें किंवा ते जर साव्हरिन अपुरे असतील तर ह्या ठेवींतल्या सोन्याचे साव्हरिन पाडून देणें ह्याकरतां कांहीं ही ठेव निर्माण करण्यांत आलेली नाहीं. तेव्हां किती सोनें ठेवींत ठेवावयाचें हें हिंदुस्तानच्या व्यापाराच्या वाढीवर व दुष्काळ वगैरे कारणांनीं प्रतिकूल परिस्थिति उत्पन्न झाली असतांना परदेशच्या व्यापाऱ्यांना देण्याकरतां किती तूट पडेल ह्यावर अवलंबून राहील.

---

# भाग पांचवा.

—:-×०×-:—

## १९०७ पासून १९१३ सालपर्यंतची परिस्थिति.

---

( ३६ ) **१९०७-८ सालची हुंड्यांची विक्री:**—१९०७-८ सालीं हुंडणावळीच्या भावांत मोठी क्रांति झाली. ह्या सालीं मोठा दुष्काळ पडला; त्यामुळें गहुं, ताग वगैरे माल बाहेर पाठविण्यांत आला नाहीं. स्टेट सेक्रेटरीनें आपल्या हुंड्या १३१ लाखपर्यंतच विकल्या. १९०६ सालीं ह्याच स्टेट सेक्रेटरीनें त्या ३४० लाखपर्यंत विकल्या होत्या. 'गंडस्योपरि पीटिका संवृत्ता' ह्या म्हणीप्रमाणें

अमेरिकेंत पैशाची टंचाई पडून युरोपखंडांतही सोन्याची चणचण भासूं लागली. ह्याच वेळेला बँक आफ् इंग्लंडनें आपला दर ७ टक्केपर्यंत चढविला. अशा तऱ्हेनें लंडन शहरांत पैशाची हकाटी सुरू झाली; हिंदुस्तानचा निर्गत मालही कमी झाल्या कारणानें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांस मागणी येईनाशी झाली; हुंडणावळीचा भाव उतरत चालला व स्टेट सेक्रेटरीनें हुंड्या विकावयाचें बंद केल्यावर हा भाव १५$\frac{१३}{१६}$ वर येऊन ठेपला. अशा वेळीं हिंदुस्तान सरकार स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या विकूं लागलें; पण प्रथम सरकारचें धोरण निश्चित होईना. कांहीं तज्ज्ञांचें मत पडलें कीं, जें कांहीं सोनें खजिन्यांत असेल तें व्यापाऱ्यांस किंवा हुंड्या विकत घेणारांस देऊन टाकावें. उलट दुसऱ्या लोकांचें असें मत पडलें कीं, सध्यां अमेरिकेंत सट्टेबाजी जोरानें चालत असल्यामुळें हिंदुस्तानांतलें सोनें होतां होईल तों बाहेर जाऊं देऊं नये. स्टेट सेक्रेटरीचें मतही निश्चित होईना. तो एक वेळ म्हणे कीं, बँकाना सोनें देऊं नका; पुनः दुसरी तार अशी करी कीं, जरी त्या बँका जबर नफा मिळवीत असल्या तरी त्यांना सोनें जास्त प्रमाणांत देण्यास कांहीं हरकत नाहीं. अशा अनिश्चित स्थितींतच सरकारनें १५$\frac{२७}{३२}$ भावानें उलट हुंड्या विकावयास काढल्या व स्टेट सेक्रेटरीनें सोनें विलायतेंत देण्यास सुरवात केली. पुनः हुंडणावळीच्या भावांत चढउतार होऊन अखेरीस मार्च महिन्यांत असें ठरलें कीं, हिंदुस्तानांत आठवड्यांतून एकदां १५$\frac{२९}{३२}$ पेन्स ह्या दरानें हुंड्या विकावयास काढाव्यात; पण पूर्वी सुचविल्याप्रमाणें १४$\frac{२७}{३२}$ पेक्षां कमी नसलेल्या दरानें तारेच्या हुंड्या विकावयास काढूं नयेत. इकडे स्टेट सेक्रेटरीनें गंगाजळींतले रोखे विकावयास काढून रोख सोनें तयार करून ठेवलें. ह्याच सुमारास मुंबईमध्यें चांदीच्या लगड्या सट्टेबाजीकरतां म्हणा किंवा खरोखर व्यापाराकरितां म्हणा येऊं लागल्या व हुंडणावळीचा भाव १५$\frac{३}{८}$ वर आला. पुन ह्या भावांत चढउतार होऊन जुलै महिन्यांत पावसाळा सुरू होऊन चणचणीची वेळ निघून गेली. सप्टेंबरमध्यें पुनः भाव चढून गेल्यावर सरकारनें हुंड्या विकण्याचें बंद झालें. ह्या वर्षांत सरकारला जे अनुभव आले ते असेः—

(३७) **१९०८ सालचा सरकारचा अनुभवः—**( १ ) आहे त्यापेक्षां जास्त गंगाजळीची आवश्यकता; ( २ ) लंडनमध्यें सोनें किंवा सोन्याचें नाणें अधिक प्रमाणांत ठेवण्यापासून फायदे; सरकारी रोखे ( सिक्युरिटीज् ) ठेवण्यापेक्षां सोनें ठेवणें अधिक श्रेयस्कर आहे; ( ३ ) आणीबाणीच्या वेळीं अगोदरच एक धोरण आखून तें लोकांत जाहीर केल्यानें फार फायदा होतो. कारण पेढीवाले व बाहेर माल पाठविणारे व्यापारी ह्या दोघांना, ज्याप्रमाणें सरकारला आणीबाणीच्या वेळीं सर्व साधनें अनुकूल असणें इष्ट असतें, त्याप्रमाणें हुंडणावळीचा भाव स्थिर करण्याचे बाबतींत सरकारावर विश्वास ठेवणें इष्ट असतें; ( ४ ) एकाच दिवशीं एकाच व्यापाऱ्याला हिंदुस्थानाबाहेर पाठविण्याकरितां १०.००० पौंडांपेक्षां जास्त रकम न देणें व देशांतल्या देशांत सोनें खजिन्यांतून बाहेर जाऊं देणें ह्यापासून फारसा फायदा होत नाहीं; ( ५ ) हिंदुस्थानांत जें सोनें प्रचलित आहे त्याचा उपयोग हुंडणावळीचा भाव स्थिर किंवा कायम ठेवण्याचे कामीं फारसा होत नाहीं. ह्या सर्व सूचनांपैकीं पहिली सूचना महत्त्वाची आहे. सुवर्णनिधि, जो मुद्दाम राखून ठेवण्यांत आलेला आहे, त्याला, स्टेट सेक्रेटरीनें रेल्वे कंपन्या वगैरेंना भांडवल पुरवून, धक्का लावतां कामा नये व निधि सिक्युरिटीजमध्यें न ठेवतां सोन्यांतच ठेविला पाहिजे. कारण हा निधि म्हणजे सरकार, व्यापारी वगैरे भांडवलवाले ह्यांना आधारस्तंभच आहे; म्हणून हिंदुस्थान सरकारनें अशी सूचना केली कीं, खजिन्यांत चलनी नोटांच्याकरितां राखून ठेवलेल्या ठराविक किंमतीच्या सोन्याशिवाय अडीच कोटी पौंड किंमतीचें सोनें किमानपक्ष बाजूला काढून ठेवलें पाहिजे व तितकें सोनें साचेपर्यंत सरकारनें स्टेट सेक्रेटरीस असें कळविलें कीं, त्यानें रेल्वे वगैरेसारख्या संस्थांना कर्जानें पैसे देऊं नये. स्टेट सेक्रेटरीनें २,५०,००,००० साव्हरिन ही रकम राखून ठेवण्यास संमति दिली; पण त्याचें म्हणणें असें होतें कीं, चलनी नोटांप्रीत्यर्थ राखून ठेवलेली शिल्लक व सुवर्णनिधींतील शिल्लक मिळून ही रकम असावी, व एवढी रकम जमेपर्यंत रुपयांवरील नफ्याचें सोनें खरेदी करीत जावें. तसेंच व्याजीं रकम न लावितां ती तशीच विनाकारण अडकावून ठेवणें हें त्यास संमत नव्हतें. कारण त्यामुळें व्याजाचें नुकसान होतें. शिवाय सिक्युरिटी

आणीबाणीच्या वेळीं हुंडणावळीचा भाव कायम राखण्याकरितां त्रिकणें हें आपल्या आटोक्याच्या बाहेर आहे असेंही त्यास वाटत नव्हतें. तरीपण १० लाख पौंड ७ दिवसांच्या बोलीनें कर्जाऊ देऊन वाटेल तेव्हां मिळतील अशा व्यवस्थेनें जादा रक्कम म्हणून बाजूला काढण्याचें त्यानें ठरविलें. ही व्यवस्था सरकारनें नाईलाज म्हणून स्वीकारली. पण पुनः ह्या सरकारनें स्टेट सेक्रेटरीस एक खलिता लिहिला. त्यानें त्या खलित्यांत असें लिहिलें कीं, दोन्ही बगला शत्रूस हल्ला करण्यास मोकळ्या असलेल्या सैन्याप्रमाणें आपली अवस्था झाली आहे म्हणून आपल्या सोन्याच्या व चांदीच्या शिल्लकीवर जोराची मागणी येऊन आपल्याला त्रास होणार नाहीं अशी व्यवस्था झाली पाहिजे. चांदीची शिल्लक ६ कोटींहून कमी होतां कामा नये; त्याचप्रमाणें चलनी नोटांच्याकरितां राखून ठेवलेल्या शिलकेंत निमी शिल्लक रुपयांत असावी. हंगामाच्या वेळीं किमान १८ कोट रुपये शिल्लक असावेत व इंग्लंड व हिंदुस्थान ह्या दोन्ही देशांत मिळून चलनी नोटांप्रीत्यर्थ जितकें सोनें राखून ठेवलेलें आहे त्यापैकीं निदान $\frac{2}{3}$ सोनें हिंदुस्थानांत राखून ठेवलें पाहिजे व इतकें सोनें राहीपर्यंत विलायतेंत सोन्याचा भरणा करूं नये. पण ह्या सूचना स्टेट सेक्रेटरीस मान्य झाल्या नाहींत. त्यानें पूर्वीचेंच रडगाणें सुरू केलें. तें असें कीं, हिंदुस्थानांत सोनें राहिलें असतां तें एक तर दागिन्यांत खर्च होईल किंवा तें सांठवून ठेवलें जाईल व फारच थोडें सोनें व्यापाराप्रीत्यर्थ खर्च केलें जाईल. तेव्हां होतां होईल तों हिंदुस्थानांत सोनें न ठेवलेलें बरें. खरें पाहिलें असतां स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारच्या सूचना फेटाळून लावण्याचें कारण नव्हतें. पण दोघांचा दृष्टिकोन निराळा होता व आहे. हिंदुस्थान सरकारला सोन्याचें चलनी नाणें सुरू करावयाचें होतें व हें करणें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट होतें; पण स्टेट सेक्रेटरीस विलायतच्या व्यापाऱ्यांचा कळवळा येत होता म्हणून होतां होईल तों तेथून सोनें काढून तें विलायतेंत व्यापाऱ्यांच्या फायद्याकरतां सांठवून ठेवणें त्यास इष्ट वाटत होतें. ह्या प्रश्नाचा कायमचा निकाल लावण्याकरितां चेंबरलेन कमिशन नेमण्यांत आलें.

**(३८) चेंबरलेन कमिशन १९१३:**—ह्या कमिशनसमोर खालील

(१) हिंदुस्थानसरकारची असलेली सामान्य शिल्लक कोठें ठेवावयाची व तिची कशी व्यवस्था करावयाची ह्याबद्दल चवकशी करणें; (२) स्टेट सेक्रेटरीनें काढलेल्या हुंड्या किंवा तारेच्या हुंड्या ह्यांची विक्री; (३) १८९८ सालीं फौलर कमिटीनें केलेल्या सूचनांप्रमाणें किंवा त्या सूचनांना पोषक असा हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याकरितां व विशेषतः सुवर्णनिधि म्हणजे गंगाजळी व चलनी नोटांप्रीत्यर्थ राखून ठेवलेला निधि ह्यांचा उपयोग करणें–विनियोग करणें–व ते ठेवण्याची जागा ह्यासंबंधानें ज्या सूचना कमिटीनें केलेल्या आहेत त्यांसंबंधानें हिंदुस्थानसरकार व स्टेट सेक्रेटरी ह्यांनीं अमलांत आणलेले उपाय. हल्लीं ह्या वर सांगितलेल्या बाबींसंबंधानें जी व्यवस्था आहे ती हिंदुस्थानाला कितपत फायदेशीर आहे ह्यासंबंधानें सूचना करणें वगैरे.

(३९) **कमिशननें केलेल्या सूचनाः—**(१) फौलर कमिटीनें केलेल्या सूचना फार योग्य आहेत असें आजपर्यंतच्या अनुभवावरून सिद्ध झालेलें आहे. चांदीच्याऐवजीं सोनें हेंच वस्तूंची किंमत ठरविण्यांत प्रमाण मानण्यांत आलें आहे, त्यामुळें हिंदुस्थानचें कोटकल्याण झालें आहे. हुंडणावळीचा भाव स्थिर असणें ही गोष्ट हिंदुस्थानास फार महत्त्वाची आहे; तरीपण ही गोष्ट फौलर कमेटीच्या मतानें दुय्यम होती. कारण त्या कमिटीच्या मतानें मुख्य गोष्ट म्हणजे सोन्याचें चलनी नाणें सुरू करणें ही होय. हिंदुस्थान सरकारनें ही सूचना अमलांत आणण्याची खूप खटपट केली; पण परिस्थितीपुढें त्या सरकारला हात टेकावे लागले. हल्लीं हिंदुस्थानांत सुवर्णविनिमयपरिमाणपद्धति प्रचलित आहे. ह्याच पद्धतीला गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड हें नांव आहे. ही पद्धति आतां भरभक्कम पायावर स्थापन झालेली आहे व १९०७–८ साल वगळलें तर ही पद्धति सर्व गोष्टींचा विचार करतां हिंदुस्थानला फार फायद्याची आहे. कारण ती स्वस्त आहे व दुसरी सुवर्णचलनपद्धति सुरू करावी तर हिंदुस्थानांत पेढ्यांची वाढ फारशी झालेली नाहीं. हिंदुस्थानला वास्तविक पाहतां सोन्याच्या चलनी नाण्याची व तीं नाणीं पाडण्याकरितां एखाद्या टांकसाळीची फारशी जरूरी नाहीं. तरीपण लोकांची उत्कट

आणीबाणीच्या वेळीं हुंडणावळीचा भाव कायम राखण्याकरितां त्रिकणें हें आपल्या आटोक्याच्या बाहेर आहे असेंही त्यास वाटत नव्हतें. तरीपण १० लाख पौंड ७ दिवसांच्या बोलीनें कर्जाऊ देऊन वाटेल तेव्हां मिळतील अशा व्यवस्थेनें जादा रकम म्हणून बाजूला काढण्याचें त्यानें ठरविलें. ही व्यवस्था सरकारनें नाईलाज म्हणून स्वीकारली. पण पुनः ह्या सरकारनें स्टेट सेक्रेटरीस एक खलिता लिहिला. त्यानें त्या खलित्यांत असें लिहिलें कीं, दोन्ही बगला शत्रूस हल्ला करण्यास मोकळ्या असलेल्या सैन्याप्रमाणें आपली अवस्था झाली आहे म्हणून आपल्या सोन्याच्या व चांदीच्या शिल्लकीवर जोराची मागणी येऊन आपल्याला त्रास होणार नाहीं अशी व्यवस्था झाली पाहिजे. चांदीची शिल्लक ६ कोटींहून कमी होतां कामा नये; त्याचप्रमाणें चलनी नोटांच्याकरितां राखून ठेवलेल्या शिलकेंत निमी शिल्लक रुपयांत असावी. हंगामाच्या वेळीं किमान १८ कोट रुपये शिल्लक असावेत व इंग्लंड व हिंदुस्थान ह्या दोन्ही देशांत मिळून चलनी नोटांप्रीत्यर्थ जितकें सोनें राखून ठेवलेलें आहे त्यापैकीं निदान $\frac{2}{3}$ सोनें हिंदुस्थानांत राखून ठेवलें पाहिजे व इतकें सोनें राहीपर्यंत विलायतेंत सोन्याचा भरणा करूं नये. पण ह्या सूचना स्टेट सेक्रेटरीस मान्य झाल्या नाहींत. त्यानें पूर्वीचेंच रडगाणें सुरू केलें. तें असें कीं, हिंदुस्थानांत सोनें राहिलें असतां तें एक तर दागिन्यांत खर्च होईल किंवा तें सांठवून ठेवलें जाईल व फारच थोडें सोनें व्यापाराप्रीत्यर्थ खर्च केलें जाईल. तेव्हां होतां होईल तों हिंदुस्थानांत सोनें न ठेवलेलें बरें. खरें पाहिलें असतां स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारच्या सूचना फेंटाळून लावण्याचें कारण नव्हतें. पण दोघांचा दृष्टिकोन निराळा होता व आहे. हिंदुस्थान सरकारला सोन्याचें चलनी नाणें सुरू करावयाचें होतें व हें करणें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट होतें; पण स्टेट सेक्रेटरीस विलायतच्या व्यापाऱ्यांचा कळवळा येत होता म्हणून होतां होईल तों तेथून सोनें काढून तें विलायतेंत व्यापाऱ्यांच्या फायद्याकरतां सांठवून ठेवणें त्यास इष्ट वाटत होतें. ह्या प्रश्नाचा कायमचा निकाल लावण्याकरितां चेंबरलेन कमिशन नेमण्यांत आलें.

**( ३८ ) चेंबरलेन कमिशन १९१३**:-ह्या कमिशनसमोर खालील मुद्दे मांडण्यांत आले होते:—

(१) हिंदुस्थानसरकारची असलेली सामान्य शिल्लक कोठें ठेवावयाची व तिची कशी व्यवस्था करावयाची ह्याबद्दल चवकशी करणें; (२) स्टेट सेक्रेटरीनें काढलेल्या हुंड्या किंवा तारेच्या हुंड्या ह्यांची विक्री; (३) १८९८ सालीं फौलर कमिटीनें केलेल्या सूचनांप्रमाणें किंवा त्या सूचनांना पोषक असा हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याकरितां व विशेषतः सुवर्णनिधि म्हणजे गंगाजळी व चलनी नोटांप्रीत्यर्थ राखून ठेवलेला निधि ह्यांचा उपयोग करणें—विनियोग करणें—व ते ठेवण्याची जागा ह्यासंबंधानें ज्या सूचना कमिटीनें केलेल्या आहेत त्यांसंबंधानें हिंदुस्थानसरकार व स्टेट सेक्रेटरी ह्यांनीं अमलांत आणलेले उपाय. हल्लीं ह्या वर सांगितलेल्या बाबींसंबंधानें जी व्यवस्था आहे ती हिंदुस्थानाला कितपत फायदेशीर आहे ह्यासंबंधानें सूचना करणें वगैरे.

(३९) **कमिशननें केलेल्या सूचनाः**—(१) फौलर कमिटीनें केलेल्या सूचना फार योग्य आहेत असें आजपर्यंतच्या अनुभवावरून सिद्ध झालेलें आहे. चांदीच्याऐवजीं सोनें हेंच वस्तूंची किंमत ठरविण्यांत प्रमाण मानण्यांत आलें आहे, त्यामुळें हिंदुस्थानचें कोटकल्याण झालें आहे. हुंडणावळीचा भाव स्थिर असणें ही गोष्ट हिंदुस्थानास फार महत्त्वाची आहे; तरीपण ही गोष्ट फौलर कमेटीच्या मतानें दुय्यम होती. कारण त्या कमिटीच्या मतानें मुख्य गोष्ट म्हणजे सोन्याचें चलनी नाणें सुरू करणें ही होय. हिंदुस्थान सरकारनें ही सूचना अमलांत आणण्याची खूप खटपट केली; पण परिस्थितीपुढें त्या सरकारला हात टेकावे लागले. हल्लीं हिंदुस्थानांत सुवर्णविनिमयपरिमाणपद्धति प्रचलित आहे. ह्याच पद्धतीला गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड हें नांव आहे. ही पद्धति आतां भरभक्कम पायावर स्थापन झालेली आहे व १९०७–८ साल वगळलें तर ही पद्धति सर्व गोष्टींचा विचार करतां हिंदुस्थानला फार फायद्याची आहे. कारण ती स्वस्त आहे व दुसरी सुवर्णचलनपद्धति सुरू करावी तर हिंदुस्थानांत पेढ्यांची वाढ फारशी झालेली नाहीं. हिंदुस्थानला वास्तविक पाहतां सोन्याच्या चलनी नाण्याची व तीं नाणीं पाडण्याकरितां एखाद्या टांकसाळीची फारशी जरूरी नाहीं. तरीपण लोकांची उत्कट

इच्छा असेल तर हीं दोन्हीं सुरू करावींत. पण तीं सुरू होईपर्यंत हल्लींचीच पद्धत कायम ठेवावी व होतां होईल तों नोटांचा प्रसार जास्त प्रमाणांत चालू करावा.

(२) गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डच्या बाबतींत महत्त्वाची गोष्ट म्हणजे देशांतल्या प्रचलित चलनी नाण्याचें जरूर तेवढेंच परराष्ट्रीय चलनी नाण्यांत परिवर्तन होण्याकरितां सोनें व सरकारी रोखे ( **स्टर्लिंग सिक्युरिटीज** ) ह्यांचा पुरेसा संग्रह असणें ही होय. ह्या बाबतींत कमिशननें हिंदुस्थान सरकारच्या सूचनांस पाठिंबा दिला व असें ठरविलें कीं, गंगाजळी ठेवीमध्यें किती रक्कम असावी हें मर्यादित करूं नये. पण सध्यां आहे त्यापेक्षां तो वाढविला पाहिजे व सर्व गंगाजळी ठेवीचा निम्मा भाग सोन्याच्या रूपानें ठेवला पाहिजे; कारण ह्या गंगाजळी ठेवीचा हेतु ज्या वेळीं हुंडणावळीच्या भावांत गडबड होऊन हुंड्या विकणें अशक्य होऊन बसतें त्यावेळीं स्टेट सेक्रेटरीनें आपला कौन्सिलचा खर्च ह्या ठेवींतून भागवून घेणें एवढाच कांहीं ह्या ठेवीचा उपयोग नाहीं; तर ज्या वेळीं हिंदुस्थानचा निर्गत माल आयात मालापेक्षां कमी होऊन हिंदुस्थानला बाहेर पैसे पाठवावे लागतात त्यावेळींही ह्या ठेवीचा उपयोग करावयाचा असतो. अशा कारणामुळें ह्या ठेवींतलें सोनें सरकारी रोखे विकत घेऊन गुंतविण्यांत येऊं नये. तसेंच १९०७-८ सालीं जी परिस्थिति उत्पन्न झाली तशी परिस्थिति उत्पन्न झाली असतांना हिंदुस्थान सरकारनें स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या हव्या तेवढ्या काढून व्यापाऱ्यांस सोनें पुरविलें पाहिजे. शिवाय हें सोनें विलायतेंत राहिलें पाहिजे व हिंदुस्थानांत ह्याच ठेवीचा भाग जो चांदीच्या रूपांत ठेवलेला आहे तो काढून टाकला पाहिजे.

(३) चलनी नोटांच्या पद्धतीला जास्त लवचिकपणा आला पाहिजे. हल्लींची पद्धति बँक आफ् इंग्लंडच्या पद्धतीवर बसविलेली आहे. ह्या बँकेला १८४४ च्या बँक अॅक्टान्वयें १ कोटी ४० लाख पौंडांपर्यंत सरकारी व इतर रोख्यांच्या आधारावर नोटा काढण्याचा अधिकार आहे. पण पुढें जर जास्त नोटा प्रचलित करावयाच्या असतील तर तेवढ्या किंमतीचें सोनें बँकिंग

खात्यांत * काढून ठेवलें पाहिजे. अशीच पद्धत हिंदुस्थानांत आहे, ती जरा ढिली करून म्हणजे युरोपखंडांत इतर राष्ट्रांत असलेल्या पद्धतीप्रमाणें जितक्या किंमतीच्या नोटा प्रचलित असतील त्या किंमतीपैकीं ठराविक रक्कम बाजूला काढून जास्त नोटा प्रचारांत आणाव्या. ५०० रुपयांच्या किंमतीच्या नोटा लोकप्रिय करण्यांत याव्या व नोटांबद्दल रुपये तावडतोब पटवून देण्याची व्यवस्था व्हावी. ज्या नोटा प्रचलित करण्यांत येत असतांना त्या किंमतीचें सोनें किंवा चांदी बाजूला काढून ठेवावी लागत नाहीं अशा रकमेवर ती रक्कम सरकारी रोख्यांत न गुंतवितां, तात्पुरतें कर्ज द्यावें किंवा इतर कोणत्याही तऱ्हेनें ती रक्कम गुंतवावी; पण ही रक्कम हिंदुस्थान किंवा इंग्लंड ह्या देशांत गुंतवितांना किंवा कर्जाऊ देतांना कांहीं ठराविक इयत्ता ठरवून घ्यावी. आणखी एक महत्त्वाची सूचना कमिशननें केली. ती अशी कीं, सरकारनें नेहमीं जादा शिलकेंतून प्रेसिडेन्सी बँकांना कर्ज देत जावें; कारण ज्या वेळीं व्यापाऱ्यांना रकमेची फार जरूर असते अशा वेळीं ही फाजील शिलक उगीच अडकावून ठेवणें फायदेशीर नाहीं. तसेंच कधींकधीं स्टेट सेक्रेटरीजवळ सोनें भरपूर असतांना स्वस्त दरानें तो हुंडया विकावयास काढीत असतो. हें करणें बरोबर नाहीं. तसेंच हिंदुस्थान सरकारनें आपलें वर्ष एप्रिल पहिलीपासून सुरू न करतां नोव्हेंबर किंवा जानेवारीच्या पहिल्या तारखेपासून सुरू करावें, म्हणजे आपलें अंदाजपत्रक त्यास अधिक बिनचूक करतां येईल व त्यामुळें स्टेट सेक्रेटरीला आपल्या निकडीच्या गरजा भागवून लंडनमध्यें किती रक्कम आपणास कर्जाऊ काढावी लागेल हें नक्की ठरवितां येईल. त्याचप्रमाणें स्टेट सेक्रेटरीला गरज नस-

* पार्लमेंटनें बँक आफ् इंग्लंडकरितां पास केलेल्या कायद्यान्वयें ह्या पेढीला दर आठवडयाला एक ताळेबंद छापावा लागतो व त्यामध्यें दोन भाग असतात. एका भागाला Issue Department असें नांव असून त्यामध्यें त्या पेढीनें काढिलेल्या नोटांचा हिशोब दिलेला असतो व दुसऱ्या भागाला Banking Department असें नांव असून त्यामध्यें पेढीच्या देण्या-घेण्याचा व मालमत्तेचा हिशोब दिलेला असतो.

तांना विलायतेंत जी हिंदुस्थान सरकारची शिल्लक पाठविण्यांत येते तिचा हिंदुस्थानांतच उपयोग करण्याची हिंदुस्थान सरकारनें खटपट करावी; पण जर स्टेट सेक्रेटरीला कर्ज काढण्याचा प्रसंग येत असेल तर अशा प्रसंगीं ही शिल्लक येथें न ठेवतां विलायतेंतच पाठविलेली बरी. ह्या सूचनांशिवाय इतर किरकोळ सूचना कमिशननें केल्या. उदाहरणार्थ, एकादी मध्यवर्ती पेढी हिंदुस्थानांत असावी अशी एक सूचना करण्यांत आली होती.

# भाग ६ वा.

## युद्धकालीन परिस्थिति.

**(४०) युद्धामुळें रुपयांची भासणारी चणचण व चांदीच्या दरामध्यें विलक्षण वाढः**—चेंबरलेन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यापासून सगळ्याच जगांत मोठी घडामोड झाली व ह्या घडामोडीचें कारण म्हणजे जगड्व्याळ युद्ध हें होय. हें युद्ध सुरू झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारनें चेंबरलेन कमिशनच्या कांहीं सूचना स्वीकारून बाकीच्या सूचनांची अम्मलबजावणी करण्याचें लांबणीवर टाकलें. युद्धाचा पहिला परिणाम असा झाला कीं, लोक सोनें गुप्त रीतीनें सांठवूं लागले. म्हणून सरकारास खाजगी कामाकरितां लोकांस सोनें देण्याची चाल बंद करावी लागली. लोक भराभर पोष्टांच्या बँकांत जाऊन आपल्या रकमा परत मागूं लागले व चलनी नोटांबद्दल रुपये मागूं लागले; ह्या गोष्टी घडण्याचें कारण म्हणजे लोकांना असें वाटलें कीं, सरकारचें ह्या युद्धामुळें

* हल्लीं १९२१ जानेवारीपासून अशी बँक स्थापन झालेली आहे.

दिवाळें निघालेलें आहे. ही लोकांची कल्पना खोटी ठरविण्याकरितां सरकारनें पोष्ट खातें व खजिन्याचे अधिकारी ह्यांना असे हुकूम सोडले कीं, जितके लोक आपल्या ठेवी व चलनी नोटांबद्दल रुपये मागावयास येतील त्यांना रुपये परत करावेत. ह्या हुकुमामुळें लोकांचा विश्वास सरकारावर ताबडतोब बसून पुनः लोक आपल्या ठेवी पोष्टांत आणून ठेऊं लागले.

चेंबरलेन कमिशनची अशी सूचना होती कीं, सरकारनें लागेल तेवढें सोनें बाहेर काढून आणीबाणीच्या वेळीं व्यापाऱ्यांची गरज भागवावी; ह्या सूचनेप्रमाणें सरकारनें सोनें खजिन्यांतून बाहेर काढून हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याचा निश्चय केला व कित्येक आठवडेपर्यंत प्रत्येक आठवड्यास १० लाख पौंड किमतीच्या उलट हुंड्या स्टेट सेक्रेटरीवर विकण्यास सुरुवात केली. हे व इतर उपाय योजून सरकारनें हुंडणावळीचा भाव कायम ठेवला. ह्या वेळीं स्टेट सेक्रेटरीजवळ भरपूर सोनें होतें. खजिन्यांतील शिल्लक व विलायत व हिंदुस्थान येथें सुवर्णनिधि मिळून दोन कोटी ३५ लाख पौंड किंमतीचें होतें. चलनी नोटांकरतां राखून ठेवलेल्या ठेवींतून ४० लाख पौंडांचें सोनें काढून तें सुवर्णनिधींत ठेवण्यांत आलें होतें. ह्या व्यवस्थेमुळें सरकारला रुपयाची किंमत कायम ठेवतां आली व नोटांबद्दल रुपये लोकांस देतां आले.

पण ही स्थिति अशीच कायम रहाणें कठिण होतें. लढाई यशस्वी व्हावी म्हणून हिंदुस्ताननें तिला लागणारें सामान व धान्य वगैरे जिन्नस बाहेर पाठविले व जर्मनीनें पाणबुड्याची मोहीम जोरांत सुरू केल्यामुळें व प्रत्येक राष्ट्र लढाईंत गुंतल्यामुळें हिंदुस्तानांत बाहेरून माल थोडा येऊं लागला. ह्या सर्वांवर कळस म्हणजे सोनें व चांदी ह्यांच्या हालचालीमध्यें भयंकर फरक पडत जाणें हें होय. प्रत्येक राष्ट्राला लढाईचें सामान विकत घेण्याकरितां सोन्याची फारच जरुरी भासूं लागली व जें तें राष्ट्र सोनें सांठवूं लागलें व आपली नित्यांतली गरज चांदीवर भागवूं लागलें. ह्यामुळें हिंदुस्तानांत नेहमीं येणारा सोन्याचा प्रवाह आटून चांदीची किंमतही वाढूं लागली. अशा परिस्थितींत हिंदुस्तानांत सोन्याचांदीचा दुष्काळ पडून सरकारला रुपयाचें व सोन्याचें पूर्वीचें प्रमाण

कायम ठेवणें कठिण वाटूं लागलें. हुंडणावळीचा भाव कायम रहाण्याकरितां स्टेट-सेक्रेटरी विलायती व्यापाऱ्यांपासून सोनें घेऊन ज्या हुंड्या विकत घेतो त्या हुंड्या घेऊन येणाऱ्या व्यापाऱ्यांना हिंदुस्तानसरकारनें रुपये दिले पाहिजेत. आतां अशी परिस्थिति उत्पन्न झाली कीं, हिंदुस्तानचा निर्गत माल खूपच वाढला व आयात माल संपुष्टांत आला; त्यामुळें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांना खूप मागणी आली. बरें, स्टेट सेक्रेटरीनें ही मागणी पुरी करावी तर हिंदुस्तान सरकार-जवळ व्यापाऱ्यांना द्यावयाला रुपये नव्हते. अर्थात हुंडणावळीचा भाव कायम राहणें शक्य नव्हतें. त्याच वेळीं खेड्यापाड्यांत जे रुपये लोकांत होते ते रुपये लोक सांठवूं लागले व चोहोंकडे रुपयांची चणचण भासूं लागली. आयात माल कमी झाल्यामुळें रुपये व सोन्याचीं नाणीं लोकांत खेळेनाशीं झालीं म्हणून शेत-करी लोक रुपये गडप करून बसले.

हा प्रसंग असा होता कीं, त्या वेळीं विलायत सरकारनें हिंदुस्तान सर-कारकडून बरेंच लढाईचें सामान विकत घेतलेलें होतें. हिंदुस्तानसरकारनें अर्थात येथील व्यापाऱ्यांकडून हा माल खरेदी केला व पैसे द्यावयाची ज्या वेळीं पाळी आली त्यावेळीं विलायत सरकारनें हे पैसे स्टेट सेक्रेटरीला देऊन टाकले. येथील सरकारला तर येथील व्यापाऱ्यांना रोख रुपये देणें भाग होतें व त्याप्रमाणें व्यापाऱ्यांस पैसे मिळालेही. पण मुख्य अडचण अशी होती कीं, विलायतेमधून हिंदुस्तानांत पैसा सोनें किंवा चांदीच्या रूपानें कसा यावयाचा ? ह्या अडचणीमुळें हिंदुस्तानच्या खजिन्यावर फारच ताण पडला. हा ताण किती पडला याची जर कल्पना करावयाची असेल तर आपण त्या वेळचे आकडे पाहिले पाहिजेत. १९१८–१९ सालीं हिंदुस्तानसरकारला ‘ होम चार्जेस् ’ वगळले तर १४ कोटी पौंडांची उलाढाल करावी लागली व ह्या रकमेचा अर्धा भाग केवळ विलायत सरकाराकरतां लढाईनिमित्त खर्च करावा लागला. त्यावेळीं हिंदुस्तानांत सोनें किंवा चांदी मोठ्या व पुरेशा प्रमाणांत येणें अशक्यच होतें. त्याचप्रमाणें हिंदु-स्तानांत चलनी नोटा काढून त्याऐवजीं विलायतेंत सोनें वेगळें काढून ठेवणें हें ही अशक्य कोटींतलें झालेलें होतें; कारण युद्धकालीं असा करण्यानें लोकांमध्यें

अविश्वास उत्पन्न झाला असता; तरीपण ह्याही युक्त्यांचा अवलंब त्यावेळीं सरकाराकडून करण्यांत आला होता.

असो; तर सांगावयाचें तात्पर्य असें कीं, हिंदुस्तान सरकारच्या रुपयांवर फारच ताण पडला; म्हणून नवीन रुपये पाडणें त्यास फारच जरूर होतें व ते रुपये पाडण्यास सरकारास चांदी घेणें भाग होतें म्हणून चांदीचा भाव चढूं लागला. हा भाव चढण्याचें दुसरें असें कारण होतें कीं, ह्याच वेळीं जगामध्यें चांदीची निपज लढाईच्यापूर्वी होणाऱ्या निपजेहून कमी होऊं लागली. ही स्थिति प्राप्त होतांच लोकही रुपये भयंकर प्रमाणांत लपवून ठेवूं लागले व रुपयाची किंमत इतकी वाढली कीं, १०० रुपयांच्या नोटीबद्दल जर रोख रुपये एखाद्यास हवे असले तर त्याला ७५ रुपये कांहीं लुच्चे लोक देऊं लागले व अशा रीतीनें कांहीं काल लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन ह्या लोकांनीं आपलें उखळ पांढरें केलें. अशा बिकट परिस्थितींत सरकारनें अमेरिकन सरकारकडे चांदीची मागणी केली व त्या सरकारनें परिस्थिति जाणून २० कोटी औंस चांदी पिटमन कायदा पास करून घेऊन हिंदुस्तानांत पाठवून दिली. सरकारनें रुपये पाडण्यास सुरुवात केली व डिसेंबर १९१८ च्या सुमारास ८३४ लक्ष रुपये पाडण्यांत आले व अशा तऱ्हेनें रुपयांची हलाक मिटविण्यांत आली.

**( ४१ ) हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याकरितां सरकारचे प्रयत्नः**—इतकें झालें तरी रुपयांत असलेल्या चांदीची किंमतही सरकारानें ठरविलेल्या रुपयाचे किंमतीहून जास्त होऊं लागली व हुंडणावळीचा भाव १ रुपयास २२ पेन्सपर्यंत येऊन ठेपला व तो ह्याच्याही पुढें जाणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. तेव्हां १ रुपयास १६ पेन्स जुना दर टिकणें अशक्य झालें. पण सरकारनें नुसता हुंडणावळीचा भावच वाढविला नाहीं तर चलनी नाण्याव्यतिरिक्त सोन्याचांदीचा दुसरा उपयोग करणें हा गुन्हा मानिला जाईल, त्याचप्रमाणें चांदी किंवा त्या धातूचें नाणें कोणी बाहेर पाठविल्यास त्यास शिक्षा केली जाईल वगैरे कायदे पास करून घेतले. तसेंच २½ रुपये व एक रुपया ह्या किंमतीच्या चलनी नोटा रुपयाचे ऐवजीं जारीनें सुरू करण्यांत आल्या. चांदीची

आवश्यकता कमी करण्याकरितां दोन आणे, चार आणे, आठ आणे, ह्या किंमतींचीं निकलचीं नाणीं पाडण्यांत आलीं. त्याचप्रमाणें आपल्याजवळचें सोनें वाढविण्याकरितां सरकारनें असा ठराव केला कीं, जितकें सोनें बाहेरून येईल तितकें आपण सांगूं त्या दरानें विकण्यांत आलें पाहिजे. मग बाजारांत त्याचा भाव कांहींही असो. सरतेशेवटीं जी गोष्ट आजपर्यंत सरकारनें केली नाहीं ती करण्याचा त्याजवर प्रसंग आला. ती गोष्ट म्हणजे मुंबईला लंडनमधील ' रॉयल मिंट 'ची शाखा उघडणें ही होय.

**( ४२ ) बॅबिंग्टन कमिटीची नेमणूकः**—अशी विलक्षण परिस्थिति प्राप्त झाल्यामुळें स्टेट सेक्रेटरीला बॅबिंग्टन कमिटी नेमणें भाग पडलें. ह्या कमिटीपुढें खालील प्रश्न विचाराकरतां मांडण्यांत आले. ( १ ) महा युद्धामुळें हिंदुस्थानांतल्या चलनी नाण्याच्या पद्धतीवर, हुंडणावळीवर व चलनी नोटांच्या स्थितीवर झालेल्या परिणामाचा विचार करणें व आजपर्यंत जो अनुभव मिळाला व पुढें जी चांदीची किंमत वाढेल त्यामुळें प्रचलित पद्धतींत कोणत्या सुधारणा इष्ट आहेत ह्याचा विचार करणें; ( २ ) त्याचप्रमाणें हल्लींच्या पद्धतींत कोणत्या सुधारणा केल्या जाव्यात व व्यापाराच्या गरजा भागविण्याकरितां, सोन्यारुप्यांच्या नाण्यांचें समाधानकारक रीतीनें चलन कायम ठेवण्याकरितां व व ' गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड ' स्थिर करण्याकरतां काय करावें ह्याबद्दल सूचना करणें.

वरील प्रश्नांवरून एक गोष्ट वाचकांस कळून येईल; ती अशी कीं, कमिटीला हुंडणावळीचा भाव स्थिर कसा होईल एवढ्याच प्रश्नाचा विचार करावयाचा होता. प्रचलित चलन पद्धति सदोष आहे किंवा निर्दोष आहे व ती जर सदोष असेल तर दुसरी एखादी सुरू करावी किंवा काय वगैरे प्रश्नांबद्दल चर्चा करण्याचें कमिटीस कारण नव्हतें.

कमिटीच्या दृष्टीनें रुपयाच्या किंमतीला स्थिरपणा आणणें ही गोष्ट महत्वाची होती; म्हणून तिचें असें म्हणणें होतें कीं, जर अगोदरच रुपयाच्या किंमतींत असा फरक झाला असेल तर पुनः पूर्वपदावर येण्यापेक्षां रुपया व

सोन्याचा साव्हरिन ह्यांत वर्तमान स्थितीला सोइस्कर असें नवीनच प्रमाण ठरवावें. हें जर करावयाचें नसेल तर दुसरे मार्ग म्हणजे (१) नवीन रुपयांत कमी वजनाची चांदी घालणें किंवा त्याचें वजन कमी करणें; (२) किंवा हल्लींचा रुपया पूर्वीप्रमाणें कायम ठेवून नवीन हलक्या वजनाचीं दोन किंवा तीन रुपयांचीं नाणीं पाडणें; (३) किंवा निकलचे रुपये पाडणें; (४) किंवा नोटाबद्दल रुपये देण्याची पद्धत कांहीं दिवस बंद ठेवणें; हे होत. पण हे सर्व मार्ग कमिटीच्या दृष्टीनें टाकाऊ होते; कारण त्यामुळें लोकांत सरकाराविषयीं फार अविश्वास उत्पन्न झाला असता. आज किती तरी वर्षें रुपया अस्तित्वांत आहे व त्याचें वजन व किंमत हीं ठरून गेलेलीं आहेत. ती किंमत व तें वजन बदलणें म्हणजे फार धोक्याचें झालें असतें.

कमिटीच्या मतानें अतिशय सोयीचा असा हुंडणावळीचा दर म्हटला म्हणजे १ रुपयास २४ पेन्स हा होय व हा दर पौंडाच्या किंमतीच्या नोटांत न दर्शवितां सोन्यांत दर्शविला जावा. कारण त्यावेळीं परिस्थिति अशी होती कीं, सोन्याचें नाणें विलायतेंत फारसें प्रचारांत नव्हतें, लोकांचें काम सरकारी खजिनाधिकारी ह्यांनीं काढलेल्या नोटांवरच चालत असे व नोटांबद्दल सोनें मिळण्याची मुष्कील असे; म्हणून ह्या नोटांची किंमत उतरली होती. अतएव कमिटीनें अशी सूचना केली कीं, रुपया व पौंडाची नोट ह्याचा संबंध न जोडतां सोनें व रुपया ह्यांचा संबंध जोडावा, म्हणजे १० रुपयांला एक साव्हरिन असा संबंध ह्यापुढें दोघांमध्यें असावा.

(४३) **कमिटीच्या मुख्य सूचनाः**—वरील सूचनेनंतर आणखी कांहीं कमिटीनें सूचना केल्या. त्या अशा: सोन्याच्या आयात निर्गतीवर सरकारचा ताबा नसावा व लोकांना ज्या तऱ्हेची चलन पद्धति हवी तीच सुरू असावी असें जरी सरकारचें धोरण असलें पाहिजे तरी होतां होईल तों सोनें सरकारच्याजवळच खजिन्यांत राहिलें पाहिजे. कारण तें परदेशीं व्यापारानिमित्त पाठविण्यास उपयोगी पडतें. मुंबईला रॉयल मिंटची शाखा सोन्याचें साव्हरिन व हाफ् साव्हरिन नाणें पाडण्याकरितां उघडली जावी; व ज्या अर्थीं हल्लीं चांदीचा दुष्काळ

आहे त्या अर्थी ह्या सोन्याच्या नाण्याबद्दल रुपये देण्याचा सरकारनें जिम्मा घेऊं नये; पुढें जेव्हां सुस्थिति येईल तेव्हां सरकारनें सोन्याबद्दल रुपये व रुपयाबद्दल सोन्याचें नाणें देण्याची व्यवस्था करावी. चांदीची खरेदी मुंबईलाच करावी, म्हणजे सरकार व लोक ह्यांचा फायदा होईल अशी एक सूचना कमिटीसमोर आली होती. पण तिजमुळें विलायतेचे व्यापारी ह्यांचें नुकसान होईल अशा भीतीनें ह्या सूचनेस कमिटीकडून वांटण्याच्या अक्षता मिळाल्या. चलनी नोटांकरितां राखून ठेवलेला सुवर्णनिधि व गंगाजळी सोन्याची ठेव ह्यांबद्दल कमिटीनें महत्वाच्या सूचना केल्या; पण पेपरकरन्सी रिझर्व्हबद्दल केलेल्या कांहीं सूचनांचा विचार पुढें येणार असल्यामुळें येथें फक्त बाकीच्या सुचनांचाच विचार आपणांस कर्तव्य आहे. त्या सूचना अशा:--

ज्या अर्थी हुंडणावळीचा भाव वाढणार त्याअर्थी पौंडांच्या किंमतीच्या रोख्यांची ( Sterling Investments ) व गंगाजळींतल्या ठेवीची नवीन किंमत ठरवावी लागणार; व ह्या दोघांचा भाव उतरल्यामुळें जें नुकसान होईल तें नुकसान हिंदुस्तानसरकारला स्टेट सेक्रेटरीस कमी रुपये पाठवावे लागणार असल्यामुळें होणाऱ्या फायद्यांतून त्या सरकारनें तें भरून काढावें. लोकांची रास्त मागणी पुरविण्याकरितां प्रेसिडन्सी बँकांना कर्ज म्हणून ५ कोटींच्या नोटा जास्त काढाव्यात; व त्याजबद्दल तारण म्हणून निर्गत मालाबद्दल ज्या हुंड्या असतील त्या घ्याव्यात. विलायतेंत जो सुवर्णनिधि ठेवण्यांत येतो त्याबद्दल लोकांची जी तक्रार होती तिची दाद घेऊन अशी शिफारस करण्यांत आली कीं, ह्या निधींतलें सोनें चांदी हिंदुस्थानांत ठेवण्यांत यावें; व जितकें सोनें ह्या निधीमध्यें आहे त्याचा अर्धा भाग हिंदुस्तानांत असावा. तसेंच हा सुवर्णनिधि किती किंमतीचा असावा ह्याबद्दल कोठलीही मर्यादा नसावी व हा निधि मुख्यत्वेंकरून सोन्याचे रूपांत असावा व बाकीचा भाग जे रोखे झटकन विकून पैसे वसूल होतील अशा रोख्यांत ठेविला जावा.

(४४) **कमेटीच्या सूचनांवर चर्चा**—ह्या सूचनांचा विचार केला असतां आपणांस असें दिसून येईल कीं, हा जो १ रुपयास २ शिलिंग

दर ठरविला गेला त्यामुळें रयतेचें फार नुकसान झालेलें आहे. रुपयाची व चांदीची जी किंमत वाढली होती ती केवळ आगंतुक कारणामुळें वाढलेली होती. ती तशी रहाणार नाहीं, पुनः चांदीची किंमत पूर्वस्थितीला येईल ही गोष्ट कमेटीच्या कानींकपाळीं लोक व कमेटींतलेच एक तज्ज्ञ सभासद मि. दलाल हे ओरडून सांगत होते. मि. दलालचें असें म्हणणें होतें कीं, हिंदुस्तानांत रुपयाला एवढी मागणी येण्याचें कारण लढाईच्या वेळीं विलायत सरकारनें हिंदुस्तान सरकारच्यामार्फत जो माल खरेदी केलेला आहे त्या मालाची किंमत हिंदुस्तानांत व्यापाऱ्यांच्या हातीं अजून आलेली नाहीं हें होय. हिंदुस्तानचा माल खरेदी केल्याबद्दल बाहेरच्या राष्ट्रांना जें हिंदुस्तानचें कर्ज झालेलें आहे तें फेडण्याकरितां त्या राष्ट्रांनीं कर्ज काढून किंवा सोनें चांदी पाठवून आपली फेड करून घेतली असती. इंग्लंडमध्यें अमेरिकेचा माल आल्यावर त्याच उपायांचा अवलंब करून अमेरिकेनें आपली कर्जाची फेड करून घेतली. पण हें सर्व सोडून ' मुरारिस्तृतीयः पंथाः ' ह्या न्यायाचा आश्रय करून कमेटीकडून हुंडणावळीचा भाव चढविला गेला. चांदीची किंमत वाढण्याचें खरें कारण असें होतें कीं, चांदी सरकार बाहेर जाऊं देईना व हुंडणावळीचा भाव तर वाढलेला; ही चांदीची किंमत फार वाढल्यामुळें इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांत कृत्रिम किंमतीच्या नाण्यांच्या किंमतीला जेव्हां धक्का बसला तेव्हां त्या देशांतील सरकारांनीं लहान किंमतीचीं नाणीं काढून किंवा आहेत त्या नाण्यांना हीणकस करून वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. तशीच क्लृप्ति येथेंही करावी व आहेत ते रुपये तसेच ठेऊन नवीन नाणीं जीं पाडावयाचीं तीं कमी चांदी घालून दोन रुपयांचीं पाडावीं म्हणजे तीं लोकांकडून आटलीं जाणार नाहींत अशी मि. दलाल ह्यांची सूचना होती. ज्या अर्थीं रुपया हें कृत्रिम नाणें आहे त्याअर्थीं त्याची किंमत कांहींही ठरवून तीं प्रचारांत आणण्यास फारशी हरकत नाहीं. आतां खरें पाहिलें असतां अशीं नाणीं सुरू करणें म्हणजे लोकांची फसवणूकच आहे व त्यामुळें जिनसांच्या किंमती फार वाढतात; पण हुंडणावळीचा भाव वाढविणें हेंही कांहीं सचेपणाचें लक्षण नव्हे. असा कृत्रिम भाव वाढविल्यानें हिंदुस्तानांत एकदम विलायती मालाची मागणी वाढून निर्गत मालाची किंमत वाढल्यामुळें त्याला मागणी कमी

कमी होत चालली आहे. खरोखर हुंडणावळीचा भाव चढल्यानें जर कोणाचा फायदा झालेला असेल तर तो इंग्रेजी व्यापाऱ्यांचाच होय. कारण ह्यांच्या मालाला युरोप खंडांत युद्धजन्यपरिस्थितीमुळें फारशी मागणी नव्हती व एका साव्हरिनला १० रुपये ( पूर्वीचा दर १५ रुपये होता ) हा दर झाल्यावर येथल्या व्यापाऱ्यांनीं भराभर मागणीला सुरुवात केली व विलायतच्या पडून तुंबून राहिलेल्या मालास इकडे येण्यास वाट फुटली. कमेटीची सूचना व दलाल ह्यांची सूचना ह्यांचा विचार करतांना 'दगडापेक्षां वीट मऊ' ह्या न्यायानें मि. दलालची सूचनाच त्यांतल्यात्यांत बरी होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

# भाग सातवा.

—:-×०×-:—

## चलनी नोटा.

---

**(४१) चलनी नोटांचा इतिहासः**—चलनी नोटा उपयोगांत येण्याचें मुख्य कारण असें असतें कीं, सोनें व चांदीसारख्या धातूंचा उपयोग होतां होईल तों व्यापारामध्यें उपयोग करावयाचा. नाणीं पाडण्यांत ह्या धातूंचा उपयोग केल्यानें त्यापासून द्रव्योत्पादक असा फायदा होत नाहीं. अशा धोरणानें सरकार व पेढ्या चलनी नोटांचा प्रसार करीत असतात. जे देश सुधारणेच्या शिखराला पोंचलेले आहेत त्या देशांत लोकांची प्रवृत्ति आपला व्यवहार नुसत्या कागदाच्या चिटोऱ्यानेंच करण्याकडे होत असते. मग तो चिटोरा सरकारी नोट असो किंवा खासगी पेढ्यांनीं काढलेली बँक नोट किंवा चेक असो. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, ह्या नोटांच्यामागें सोनें किंवा चांदी असते; पण हीही गोष्ट खरी आहे कीं, जितक्या किंमतीच्या नोटा प्रचारांत

असतात तितक्याच किमतीचें सोनें किंवा चांदी कोणी ठेवीत नाहीं. कांहीं देशांत ह्या नोटा सुरू करण्याचा मक्ता कांहीं विविक्षित पेढयांना–उदाहरणार्थ, इंग्लंडमध्यें बँक ऑफ् इंग्लंड ह्या पेढीला–दिलेला असतो; वर अमेरिकेसारख्या देशांत वाटेल त्या बँकेनें सरकारनें ठरविलेल्या अटी संभाळून ह्या नोटा काढण्याची मुभा असते. वास्तविक पाहिलें असतां ज्याअर्थी लोकांच्या विश्वासाचा फायदा घेऊन त्यावर फारसा खर्च न करतां पैसे मिळविण्याचा लोभ कोठल्याही पेढीला होण्याचा संभव असतो, त्याअर्थी सरकारचा ताबा ह्या नोटा काढण्याचे बाबतींत पेढयांवर असणें इष्ट आहे. रशियासारख्या देशांत, सरकारीच पेढया असल्यामुळें, असा ताबा असण्याची जरूरी नसते. पण ज्या इंग्लंड, जर्मनी वगैरे देशांत अशा सरकारी पेढया नसतात त्या देशांत जनहिताच्या दृष्टीनें असा ताबा असणें अत्यवश्यक असतें.

इतर देशांच्या मानानें व्यापाराचे बाबतींत हिंदुस्थान देश मागसला असल्यामुळें होतां तों होईल तों आपला व्यवहार चलनी नोटांवरच भागवावयाचा ही प्रवृत्ति येथें फारशी दिसून येत नाहीं. ह्याच कारणानें कागदाच्या चिठोऱ्यापेक्षां धातूंच्या नाण्याचें महत्व खेडेगांवच्या शेतकऱ्यांस जास्त वाटतें. ह्या प्रवृत्तीचें मुख्य कारण असें आहे कीं, ह्या कागदी नोटा वापरण्यांत येतांना लवकर फाटण्याचा संभव असतो. त्या मानानें धातूंचीं नाणीं हरवल्याशिवाय नाहींशीं होण्याचा संभव नाहीं. खरोखर पाहिलें तर ह्या लोकांच्या प्रवृत्तीबद्दल त्यांस नांव ठेवणें रास्त होणार नाहीं. हल्लीं रुपयाच्या किंवा अडीच रुपयांच्या ज्या नोटा आहेत त्या इतक्या लवकर फाटतात कीं, ह्या नोटांपेक्षां नाणींच बरीं असें लोकांस वाटलें तर त्यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं. जसजशी लोकांची औद्योगिक प्रगति होईल व त्यांच्यामध्यें ज्ञानप्रसार होईल तसतसें लोकांचें मन बदलून ह्या नोटांचा जास्त प्रसार होईल.

१८६१ सालचा कायदा पास होण्यापूर्वी सरकार चलनी नोटा काढीत नसे. अशा नोटा काढणें हें खाजगी पेढ्यांकडेच सोंपविलें असे; व ह्या पेढ्या म्हणजे कलकत्ता, मुंबई व मद्रास येथील पेढ्या होत व ह्या नोटांचा प्रसार ह्या

तीन शहरांपुरताच असे. अर्थात ह्या पेढ्यांच्या नोटांना कायदेशीर नाणें अशी संज्ञा देणें शक्य नव्हतें.

बँक अफ् बेंगाल ह्या पेढीचें अस्तित्व १८०६ सालापासून आहे. ह्या पेढीला मिळालेल्या सनदेनें १० रुपयांपासून १०,००० रुपयांपर्यंत किंमतीच्या नोटा काढण्याचा अधिकार तिला मिळला. ह्या पेढीनें किती किंमतीच्या नोटा काढाव्यात ह्याबद्दल स्पष्ट निर्बंध नव्हता. पण सरकारच्या दोन अटी अशा होत्या कीं, पेढीचें जें ५० लाखांचें भांडवल आहे त्याहून जास्त रकमेच्या नोटा काढण्यांत येऊं नयेत व जितक्या किंमतीच्या नोटा काढलेल्या असतील त्याची ⅓ नगद ठेवलेली असली पाहिजे. पुढें पुढें बँकेचा व्यवहार वाढल्यावरही नोटांच्या किंमतीची ही संख्या दोन कोटींपर्यंत गेली.

ह्या पेढीच्या नोटांचा फारसा प्रचार न होण्याचें असें कारण होतें कीं, ह्या नोटा कायदेशीर नाणें मानलें जात नसे व कलकत्त्याच्या बाहेर ह्या नोटांना फारसें महत्त्व नसे; कारण त्या बाहेर वटविल्या जात नसत. पण पुढें पुढें सरकार ह्या नोटांचा स्वीकार कलकत्ता व खालचा बंगाल प्रांत ह्या भागांत करूं लागलें व सरकारी खजिन्यांत ५० लाखांपर्यंत ह्या नोटा ठेवलेल्या असत. ह्या पेढीनें आपणांस प्रयागेस एक शाखा उघडावयाची आहे तेव्हां आपल्या नोटा त्या वेळेचा वायव्येकडील प्रांत म्हणजे हल्लींच्या संयुक्त प्रांतात असलेल्या खजिन्यांत स्वीकारण्यांत याव्या अशी विनंति सरकारास केली, तीस सरकारनें जें उत्तर दिलें तें लक्ष्यांत ठेवण्यासारखें होतें. सरकारचें असें म्हणणें होतें कीं, स्वतः काढलेल्या नोटांबद्दल त्याच प्रांतांत पैसे देण्यास जर बँक कबूल असेल तर आपण तिचें म्हणणें कबूल करूं. बँकेला ही गोष्ट ठाऊकच आहे कीं, ह्या संयुक्त प्रांतांत जी शिल्लक राहते ती कलकत्त्याला व्यापाऱ्यांनीं काढलेल्या हुंडींच्या द्वारें किफायतीनें आपणांस आणतां येते. ह्या उत्तराचा असा अर्थ होतो कीं, विवक्षित भागांत बँकेच्या नोटा स्वीकारण्याची जरी सरकारची तयारी होती तरी खालच्या बंगाल प्रांतांत त्या नोटांबद्दल रुपये देण्याची किंवा त्या स्वीकारण्याची कबुली असलेल्या लोकांनीं मागितल्याखेरीज पुनः त्या काढण्याची त्याची बिलकूल इच्छा नव्हती.

बँक आफ् बाँबेची संस्थापना १८४७ सालीं झाली व ह्या पेढीला दोन कोटींपर्यंत नोटा काढण्याला अधिकार मिळाला होता. मद्रास येथील बँकेला एक कोटीपर्यंतच नोटा काढण्याचा अधिकार असे; पण तितक्याही किंमतीच्या नोटा ह्या पेढीनें काढिल्या नाहींत.

ह्यावरून आपणांस असें दिसून येईल कीं, सरकारी चलनी नोटा सुरू होण्यापूर्वी ह्या तिन्ही बँकांना ५ कोटी रुपयांपर्यंत नोटा काढण्याचा अधिकार मिळालला होता व फक्त त्यांना १। कोटीचे रुपये नगद म्हणून ठेवावे लागत असत. १८६२ सालापासून हिंदुस्तानांतल्या कोठल्याही पेढ्यांना नोटा काढण्याचा अधिकार सरकारनें दिलेला नाहीं.

**(४६) चलनी नोटांच्या प्रसाराच्या पद्धतीबद्दल दोन मतें:**—सरकारनें आपल्या नोटा सुरू करण्यास आरंभ १८६२ सालीं केला. इतर देशांकडे पाहिलें तर चलनी नोटा भरभक्कम पायावर सुरू करण्याची कामगिरी देशांतल्या खाजगी पेढ्यांकडे असते; पण हिंदुस्तानांत ही कामगिरी सरकारास पार पाडावी लागली ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. १८५९ सालीं हिंदुस्तानसरकारनें स्टेट सेक्रेटरीकडे त्या वेळचे वसूलखात्याचे अधिकारी लुशिंग्टन ह्यांचा खलिता पाठवून दिला. त्यांत सरकारी चलनी नोटांची एक सूचना त्यांनीं तयार करून पाठविली. ती अशी कीं, ३०० पासून ४०० मैलांच्या टापूंत कांहीं मोठ्या शहरांत असलेल्या खजिन्यांत ह्या नोटांबद्दल रुपये पटवून द्यावेत व सर्वांत लहान नोट १० रुपयांची असावी. ह्या साहेबाच्या मतानें ह्याहून लहान किंमतीची नोट सुरू केली तर ज्यावेळीं लोकांचा विश्वास उडून जातो त्यावेळीं ह्या लहान किंमतीच्या नोटा फारशा उपयोगी पडत नाहींत व ह्या नोटाबदली नाणें देण्यास पुरेसें सोनेंही जवळ असत नाहीं. ह्या विधानांत किती तथ्य आहे तें हल्लीं प्रचारांत असलेल्या १ रुपयाच्या नोटांवरून वाचकांस समजून येईल. ही सूचना अर्थात स्टेट सेक्रेटरीस पसंत न पडून ती कागदे पत्रीं पडून राहिली. त्यावेळीं हिंदुस्तानांत वुइल्सन साहेबाची वसूलखात्याचे कार्यकारी सभासद म्हणून प्रथमच नेमणूक झालेली होती व ह्या साहेबानें हा प्रश्न नेटानें

हातीं घेतला. त्यावेळीं इंग्लंडमध्यें ह्या चलनी नोटांच्या प्रश्नाबद्दल दोन मतें प्रचलित होतीं. एक मत असें होतें कीं, नोटा जर प्रचलित केल्या तर त्यांबद्दल त्या नोटा घेणारांस केव्हांही नाणें मिळू नये व दुसरें मत असें होतें कीं, जेव्हां नोटा प्रचलित करण्यांत येतात तेव्हां त्यांबद्दल लोकांस जर नेहमीं नाणें मिळेल तरच त्या प्रचलित कराव्यात. ह्या दुसऱ्या मताचा पुरस्कर्ता वुइल्सनसाहेब होता. ह्या दुसऱ्या मताच्या पुनः दोन शाखा होत्या. एका शाखेचें असें मत असे कीं, जितक्या किंमतीच्या नोटा लोकांत सुरू करण्यांत येतात तितक्याच किंमतीचें सोनें किंवा नाणीं खजिन्यांत बाजूला काढून ठेवलेलीं पाहिजेत. मात्र एक ठराविक संख्येपर्यंत ज्या नोटा काढावयाच्या त्याच्याबदलीं ह्या सोन्याची जरूर नाहीं. ही संख्या कोणती हें मात्र अनुभवानें ठरविलें पाहिजे. दुसऱ्या शाखेचें मत असें होतें कीं, ही अट असण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण ज्या अर्थी नोटांबद्दल आपण नाणें देण्यास तयार आहों त्याअर्थी त्या नोटा फाजील प्रमाणांत सुरू होणें अशक्य आहे व जेव्हां जेव्हां नोटा काढावयाच्या असतील त्या त्यावेळीं कांहीं ठराविक रोकड किंवा तारण रोखे बँकांनीं किंवा सरकारनें काढून ठेवावे असा जर कायदा केला तर नोटांबद्दल नाणें देणें केव्हांही शक्य होईल.

(४७) **वुइलसन साहेबाची सूचनाः**—वुइल्सन साहेबाचें मत अशाच प्रकारचें होतें. त्यानें हिंदुस्तानांत आल्यावर स्टेट सेक्रेटरीला लिहिलेल्या एका खलित्यांत अशी सूचना केली कीं, ह्या देशांत चलनी नोटांचा प्रसार विस्तृत प्रमाणांत सुरू करण्यांत यावा व जितक्या किंमतीच्या नोटा असतील त्या किंमतीच्या १/३ किंमतीचें नाणें अलग ठेवण्यांत यावें व बाकीच्या २/३ किंमतीचे तारण रोखे ( Government securities ) ठेवण्यांत यावे म्हणजे त्या रोख्यांवर व्याज मिळेल. हिंदुस्तानचे ४० किंवा ५० विभाग कल्पिण्यांत यावे व जो कोणी नोटा घेऊन येईल त्याला ह्या विभागाच्या ठिकाणीं किंवा इलाख्याच्या राजधानीचे ठिकाणीं नोटाबद्दल रुपये देण्यांत यावेत. तसेंच एक मोठें खातें निर्माण करण्यांत यावें व ह्या खात्याचा संबंध टांकसाळ व तिचे

अधिकारी यांच्याशीं असावा व पेढ्या किंवा सरकार ह्यांच्याशीं बिलकूल नसावा. हे जे अधिकारी नेमले जातील त्यांना काढण्याचा अधिकार फक्त स्टेट सेक्रेटरीला असावा व त्यांच्या कार्याची दिशा एक कायदा करून ठरविण्यांत यावी. नोटांची किंमत ५,१०,२०,५०,१०० व ५०० रुपयांपर्यंत असावी. ह्या खलित्याचे शेवटीं त्यानें असेंही कळविलें कीं, हिंदुस्तानांत विलायतेमधील बँक आफ् इंग्लंडच्या धर्तीवर एक मोठी सरकारचें कामकाज करून देणारी व हिंदुस्तानांतल्या व्यापारी वर्गाच्या गरजा भागविणारी पेढी स्थापन करण्यांत यावी. वरील सर्व सूचना जर अमलांत आल्या असल्या तर गेल्या महायुद्धाचे वेळीं सरकारची जी त्रेधा उडाली ती उडाली नसती. पण ह्या सूचना स्टेट सेक्रेटरीकडून फेटाळण्यांत आल्या.

(४८) १८६१ चा चलनी नोटांबद्दलचा कायदाः-१८६१ सालीं म्हणजे वुइल्सनसाहेब मेल्यावर पहिला चलनी नोटांचा कायदा पास करण्यांत आला. ह्या कायद्यान्वयें असें ठरलें कीं, सरकारी खात्याकडून चलनी नोटांचा प्रसार करण्यांत यावा. ह्या नोटांची किमान किंमत १० रुपये असावी. ह्या नोटांच्या प्रसाराकरितां हिंदुस्तानचे तीन किंवा जास्त विभाग करण्यांत यावे व प्रत्येक विभागांत एक मुख्य शहर असवें व येथूनच नोटांचा प्रसार करण्यांत यावा. तीन भागांचीं तीन मुख्य शहरें असावींत व तीं कमिशनरांच्या ताब्यांत असावींत. ह्या मुख्य शहरांतून किंवा ह्या भागाच्या जेथें शाखा प्रस्थापित केल्या असतील त्या शाखांतून नोटा देण्यांत याव्यात व नोटांचे बदलीं रुपये ह्या भागाच्या मुख्य शहरांत जेथें खजिना असेल तेथें किंवा इलाख्याच्या राजधानीचे शहरांत असलेल्या चलनी नोटांच्या ऑफिसांत मिळावे. ह्या नोटांबद्दल रोख रुपये किंवा चांदी पाहून ठेवलेली असावी व ह्या शिलकीशिवाय ४ कोटी रुपयांचे तारण रोखे घेवून ठेवलेले असावे. ह्या नोटा आपआपल्या भागांत कायदेशीर नाणीं मानण्यांत याव्यात.

अशा तऱ्हेनें हिंदुस्तानांत १८४४ च्या इंग्लंडमधील बँक चार्टर नांवाच्या कायद्याच्या धर्तीवर कायदा करून सरकारनें चलनीनोटा सुरू करण्याचा मक्ता घेतला.

ह्या वेळीं जी पद्धति सुरू करण्यांत आली तीच पद्धति सुमारें ५० वर्षेपर्यंत टिकली. ह्या नोटा जेव्हां जेव्हां प्रचारांत आणावयाच्या असतील तेव्हां तेव्हां त्या नोटांच्या बदलीं सरकारनें सुरू केलेले रुपये किंवा उत्तम चांदी किंवा जर परदेशचीं नाणीं असतील तर नाणें पाडण्यास उपयोगी अशा १००० तोळ्यांबद्दल ९७९ रुपये ह्या दरानें तीं परदेशचीं नाणीं ठेवण्यांत यावीत; त्याचप्रमाणें चांदीच्या ऐवजीं हिंदुस्थानांतलें किंवा परदेशचें जर सोनें किंवा सोन्याचीं नाणीं असतील तर त्यांच्या आधारावर जाहीरनामा काढल्यावर नोटा सुरू करण्यांत याव्या असें ठरलें त्याचप्रमाणें नोटा सुरू करण्याचे कामीं प्रेसिडेन्सी बँकेचा उपयोग करण्यांत यावा. म्हणजे त्याच कामाकरितां आणखी निराळीं ठिकाणें ठरवावयाला नकोत, व ह्या त्यांच्या कामाबद्दल त्यांना दरसाल दर शेंकडा ३/४ रुपया कमिशन म्हणून देण्यांत यावे असें, प्रथम स्टेट सेक्रेटरी विरुद्ध होता तरी, ठरविण्यांत आलें. पण १८६२ सालीं स्टेट सेक्रेटरीनें एक स्पष्ट हुकूम हिंदुस्तान सरकारास दिला व त्या सरकारास असें कळविलें कीं, वर्तमान परिस्थिति न बदलतां होतां होईल तों चलनी नोटांच्या खात्याच्या नोटा प्रचलित करण्याचे बाबतींत पेढ्यांशीं बिलकूल संबंध असूं नये. कारण ह्या पेढ्यांची प्रवृत्ति नोटांचा प्रसार लोकांत करवून आपल्याजवळ असलेली चांदी काढून टाकण्याकडे होईल व शक्य तितका नोटांबद्दल रुपये न देण्याचा ह्या पेढ्या प्रयत्न करतील. प्रेसिडेन्सी बँकांना सुद्धां हें म्हणणें पटून त्यांनीं आपला संबंध ह्या चलनी नोटांच्या खात्याशीं तोडून टाकिला.

ह्या चलनी नोटांच्या प्रचारामुळें दुसरा एक मजेदार परिणाम झाला. ह्या नोटा सुरू करण्यांत मूळ हेतू असा होता कीं, लोकांना एक स्वस्त व सोयीची चलनपद्धति मिळावी. पण पुढें पुढें असा परिणाम होण्याचा संभव दिसूं लागला कीं, ज्या वेळीं देशांत पैसा भरपूर असेल त्या वेळीं ह्या चलनी नोटांच्या साहाय्यानें फाजील पैसा काढून घ्यावयाचा व ज्या वेळीं त्याची चणचण असेल त्या वेळीं तो पुनः सुरू करावयाचा. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पश्चिम युरोपकरितां बँक ऑफ् इंग्लंड जी कामगिरी करून राहिली आहे तीच कामगिरी हेंच

चलनी नोटांचें आफीस आपल्या निरनिराळ्या मुख्य ठिकाणांतून करण्याचा संभव आहे.

**(४९) चलनी नोटांचा महायुद्धापर्यंतचा इतिहासः—** हिंदुस्थानांत चलनी नोटांचा प्रसार हळूं हळूं सुरू झाला. वर सांगण्यांत आलेलेंच आहे कीं, चलनी नोटा सुरू करतांना ४ कोटी किंमतीचे तारण रोखे घेऊन ठेवण्यांत यावे. पुढें ही रोख्यांची किंमत वाढून १९११ सालीं १४ कोटींपर्यंत गेली व ह्या १४ कोटींपैकीं ४ कोटींचे तारण रोखे हिंदुस्तान सरकारच्या तारण रोख्यांव्यातिरिक्त असावेत, असें ठरलें. त्याचप्रमाणें चलनी नोटांचा प्रसार ४० कोटींनीं वाढला. १९०५ सालीं एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. ती ही कीं, लंडन शहरीं ह्या चलनी नोटांच्या निधीची एक शाखा उघडण्यांत आली व हळूंहळूं १० रुपयांहून कमी किंमतीच्या नोटांचा म्हणजे एक रुपया किंमतीच्यासुद्धां नोटांच सार्वत्रिक प्रसार करण्यांत आला. त्याचप्रमाणें ह्या काळांत ह्या चलनी नोटांकरतां राखून ठेवलेल्या निधींत १८९८ सालीं हिंदुस्थानांत व १९०६ सालीं लंडन शहरीं सोनें ठेवण्यांत येऊं लागलें व सोन्याचें नाणें किंवा सोनें ह्याच्या बदलीं वाटेल तेवढ्या रकमेच्या नोटा देण्यांत येऊं लागल्या. १८९८ सालीं एक 'गोल्ड नोट' नावांचा कायदा पास करण्यांत आला. ह्या कायद्यान्वयें विलायतेंत जें सोनें राखून ठेवलें असतें त्यावर हिंदुस्थानांत नोटा देणें सुरू करण्यांत आलें; त्यामुळें पैसाची चणचण जरा कमी भासूं लागली. तसेंच कलकत्ता, मुंबई, मद्रास, रंगून, कराची, कानपूर व लाहोर ह्याच शहरांत नोटा देण्याचें कायद्यानें ठरलें. पूर्वी फक्त कलकत्ता, मद्रास व मुंबई ह्या तीनच शहरांतून लोकांस नोटा मिळत. तसेंच वीस रुपयांची नोट रद्द करण्यांत येऊन १९११ सालीं १०० रुपयांची नोट सार्वत्रिक (म्हणजे सर्व देशभर चालणारी) करण्यांत आली.

वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, १८९८ सालीं 'गोल्ड नोट' नांवाचा कायदा पास करण्यांत आला. हा कायदा खरोखर तात्पुरता असून कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें त्याची जरूर भासली. ही परिस्थिति अशी होती कीं, स्टेट

सेक्रेटरी ह्यानें विलायतेमधील व्यापाऱ्यांच्या सोयीकरतां स्वतःला जरूर नसतांनाही जास्त हुंड्या विकल्या. ह्या हुंड्यांबद्दल येथील सरकाराला आपल्या खजिन्यांतून रुपये देणें अशक्य झालें. तेव्हां स्टेट सेक्रेटरीनें येथील सरकारास चलनी नोटाप्रीत्यर्थ राखून ठेवलेल्या निधींतून पैसे देण्यास परवानगी दिली व तितक्या किंमतीचें सोनें त्याच निधीच्या विलायतेमधील शाखेंत ठेवून दिलें. ही व्यवस्था प्रथम दोन वर्षांकरतां होती. पण १९०२ सालपासून एक कायदा पास होऊन ती कायम करण्यांत आली. ह्यामुळें स्टेट सेक्रेटरीला चांदी विकत घेऊन ती हिंदुस्थानांत पाठवितां येतें व ह्या चांदीचा उपयोग फक्त चलनी नाण्याकरतांच करावयाचा असतो.

**(५०) चलनी नोटांप्रीत्यर्थ राखून ठेवलेला निधिः—** (पेपर करन्सी रिझर्व्ह) हा निधि काय आहे ह्याचा जर आपण विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, ह्या निधीमध्यें चांदी, सोनें व तारण रोखे ( सिक्युरिटीज ) ह्या तिघांचा समावेश होतो. त्या तिघांपैकीं चांदी ही हिंदुस्थानांत ठेवण्यांत येते. सोनें व तारण रोखे हिंदुस्थान व इंग्लंड ह्या दोन देशांत ठेवण्यांत येतात. इंग्लंडमधल्या तारण रोख्यांत दरसाल दरशेंकडा ३॥ दराचें इंग्लंडच्या राजानें हमी घेतलेलें कर्ज व सरकारी खजिन्यावरील हुंड्या ( Treasury Bills ) ह्यांचा अंतर्भाव होतो व हिंदुस्थानच्या तारण रोख्यांत १८४२-४३ सालचे ३॥ टक्क्याचे कर्जरोखे, १८९६-९७ सालचे ३ टक्याचे कर्ज रोखे व सरकारी तिजोरीवरील हुंड्या ह्यांचा समावेश होतो.

आतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, ह्या निधीची जी शाखा विलायतेमध्यें आहे ती काय म्हणून. हिंदुस्थानांत रुपयाचें नाणें आहे तेव्हां येथें चांदीची जरूरी लागणार व ती चांदी विलायतेस विकत घ्यावयाची तर त्याकरितां सोनें पाहिजे म्हणून ह्या निधीची शाखा सोन्याच्या रूपांत विलायतेंत उघडण्यांत आली आहे असें कांहीं जण प्रतिपादन करितात. पण चांदी ही हिंदुस्तानांतच कां खरेदी करूं नये हें समजत नाहीं. मुंबईसारख्या शहरांत मोठ्या प्रमाणांत चांदीचा बाजार आहे व ह्या बाजारांत हिंदी व्यापाऱ्यांना हातीं घेऊन

जर चांदी खरेदी करण्यांत आली—व अशी चांदी येथेंच खरेदी करा असें म्हणण्याचा हिंदुस्थानच्या लोकांस हक्क आहे, कारण ही चांदी हिंदुस्थानकरितां हिंदुस्थानचेच खर्चानें खरेदी करावयाची आहे—तर येथील धंद्याला चांगलें उत्तेजन येण्याचा संभव आहे. पण स्टेट सेक्रेटरीला विलायतेच्या व्यापाऱ्यांबद्दल, उदाहरणार्थ मॉंटेग्यु कंपनीबद्दल, सहानुभूति वाटत असून ह्या चांदीखरेदीप्रीत्यर्थ होणारा नफा परदेशच्या व्यापाऱ्यांच्या हातांत पडत आहे. ही झाली चांदीची गोष्ट. पण ह्या निधीमध्यें जें सोनें सांठविण्यांत येतें तें विलायतेंत कां ठेवण्यांत यावें हें समजणें मुष्किल आहे.* शिवाय हें जें सोनें विलायतेंत कां होईना, ठेवण्यांत येतें त्याचा मुख्य उपयोग असा आहे कीं, ज्यावेळीं हुंडणावळीच्या भावांत गडबड होईल त्यावेळीं तो कायम ठेवण्यास सरकारास नोटांऐवजीं रुपये देण्याचा प्रसंग आला असतांना हें सोनें उपयोगांत आणावयाचें. पण मौज अशी आहे कीं, स्टेट सेक्रेटरी आपल्या मर्जीप्रमाणें ह्या राखून ठेवलेल्या सोन्याचा उपयोग करीत असतो. तसेंच हें सोनें वास्तविक स्टेट सेक्रेटरीनें बँक ऑफ् इंग्लंडजवळ ठेवून तिला त्या सोन्याचा इतरत्र कशाही तऱ्हेनें उपयोग करूं देतां कामा नये. पण त्या सोन्याचा उपयोग होतो इंग्लंडमधील समवायिक भांडवल असलेल्या पेढ्यांना; आणि जेव्हां स्टेट सेक्रेटरीला खरोखरच त्यांची जरूर पडते त्या वेळीं ह्या सोन्याचा त्याला उपयोग होत नाहीं. कारण तें सोनें त्या पेढयांनीं व्यापारांत गुंतविलें असतें. अशी या पेपर करन्सी रिझर्व्हची मनोरंजक हकीगत आहे.

(५१) **चेंबरलेन कमिशनच्या सूचनाः**—ह्या चलनी नोटांसंबंधानें चेंबरलेन कमिशननें कांहीं सूचना केल्या त्या अशाः—

(१) हा चलनी नोटांप्रीत्यर्थ राखून ठेवलेला निधि जास्त लवचिक असावा म्हणजे चलनी नोटांच्या मोबदला ठेवलेल्या रकमेंतून तूर्त २० कोटींपर्यंतच्या रुपयांचे रोखे घ्यावे. यापुढें जेवढया चलनी

* हल्लीं हें सोनें ठेवण्याची चाल बंद झाली आहे.

नोटा रिझर्व्ह* खजिन्यांत शिल्लक असतील तेवढी रक्कम आणि जेवढया नोटा बाजारांत खेळत्या असतील त्यांच्या जास्तींत जास्ती एक तृतीयांशाइतकी रक्कम रोखे घेण्यांत गुंतविण्यास हरकत नाहीं. या रोख्यांतून प्रसंगवशात् कांहीं रक्कम लंडन शहरीं किंवा हिंदुस्थानांत अल्प मुदतीनें कर्जाऊ देण्यास हिंदुस्थान सरकारास अधिकार असावा.

हिंदुस्थानांत सरकारनें प्रेसिडेन्सी बँकांना थोड्या मुदतीच्या बोलीनें कर्ज द्यावें व व्यापार तेजींत असतांना चलनी नोटाप्रीत्यर्थ ठेवलेल्या निधीच्या जोरावर विकलेल्या हुंड्यांमुळें आलेले पैसे स्टेट सेक्रेटरीला कर्जाऊ देण्यास अधि- कार असावा; मात्र वर सांगितलेली बाजारांत खेळत्या नोटांची जी रक्कम आहे तिच्या २/३ पेक्षां कमी रक्कम ह्या ' पेपरकरन्सी रिझर्व्ह 'मध्यें असलेल्या रोकडी- मध्यें असूं नये. अशा तऱ्हेनें हिंदुस्थान सरकाराला थोड्या मुदतीचें कर्ज देण्याचा अधिकार असला म्हणजे सहजासहजीं ह्या कर्जाऊ रकमेवर व्याज मिळेल, लोकांना व्यापाराच्या तेजीच्या वेळीं भासणारी टंचाई कमी होईल व जसजशा नोटा जास्त प्रचलित होतील, तसतसे वेगळा कायदा न करतां ह्या पेपरकरन्सी रिझर्व्हमधून दीर्घकाल मुदतीचे किंवा थोड्या मुदतीचे तारणरोखे अधिक घेतां येतील. त्याचप्रमाणें विलायतेमध्येंहि थोड्या मुदतीचे रोखे विकत घेऊन किंवा कर्ज देऊन जर रक्कम गुंतविण्यांत आली तर पुढें चांदी खरेदी करण्याकरितां लागणारा पैसा उत्पन्न करण्यास स्टेट सेक्रेटरीला ह्या ' पेपरकरन्सी रिझर्व्ह 'च्या जोरावर हुंड्या विकतां येतील व पूर्वी ह्याच हुंड्या विकून येणारे पैसे सोनं विकत घेण्यांत खर्च झाल्यामुळें जें व्याजाचें वगैरे नुकसान होत असे, तें ह्या नवीन पद्धतीमुळें होणार नाहीं.

---

* हे राखीव खजिने फक्त कलकत्ता, मुंबई, व मद्रास ह्या तीन शहरांतच आहेत. ह्या खजिन्यांत निकडीच्या गरजा भागवल्यावर जो जास्त पैसा शिल्लक रहातो तोच ठेवण्यांत येतो. पेपर करन्सी रिझर्व्हशी याचा बिलकूल संबंध नाहीं.

कमिशनचें असें मत होतें कीं, एका ठराविक जास्तींत जास्त किंमतींच्या नोटांकरितां किती रक्कम ठेवावयाची, हें अनुभवानें ठरल्यावर व तितकी रक्कम बाजूला काढून ठेवल्यावर ज्या जास्त नोटा आपण काढतों त्या नोटांबद्दल तितक्याच किंमतीचें सोन्यारुप्याचें नाणें बँक ऑफ इंग्लंडच्या धर्तीवर बाजूला काढून ठेवणें हें गैरसोयीचें होतें. गोल्ड नोट नांवाचा कायदा पास करून व विलायतेंत हुंड्या विकून जें सोनें स्टेट सेक्रेटरीस मिळतें, त्याच्या जोरावर हिंदुस्थानांत नोटांचा प्रचार करण्यांत येतो. पण हें सोनें स्टेट सेक्रेटरी आपल्याजवळ ठेवीत नाहीं. तें एक तर बँक ऑफ इंग्लंडमध्यें राहतें किंवा सिक्युरिटीजरूपानें तो आपल्याजवळ ठेवतो. तेव्हां एखादे वेळीं जर सोनें विलायतेंत दुर्मिळ झालें व लोकांनीं नोटा खजिन्यांत आणून नाण्याची मागणी केली, तर कठीण प्रसंग ओढावयाचा. ही आपत्ति टळावी म्हणून ही वरील सूचना कमिटीनें केली होती.

( २ ) हिंदुस्थानांत नोटांचा प्रसार जास्त प्रमाणांत करण्यांत यावा; नोटांबद्दल रुपये ज्या ठिकाणीं देण्यांत येतात, त्या ठिकाणाची संख्या जास्त प्रमाणांत करण्यांत यावी; नोटांबद्दल रुपये देण्याची अधिक व्यवस्था व्हावी; ५०० रुपयांची नोट हिंदुस्थानांत चोहोंकडे चालावी व ह्या नोटीचा अनुभव आल्यावर त्याहून जास्त रकमेच्या नोटा चोहोंकडे चालविण्याचा प्रयत्न करावा.

( ३ ) पेपरकरन्सी रिझर्व्हमध्यें जें सोनें ठेवलेलें असतें, त्याचा उपयोग नेहमींच्या वेळीं देशांतल्या देशांत लोकांना देण्याकरितां व्हावा; पण ज्या वेळीं हुंडणावळीचा भाव १५$\frac{२९}{३२}$ पेन्सवर येईल, त्या वेळीं मात्र ज्या लोकांना सोनें ताबडतोब बाहेर पाठवावयाचें असेल त्यांनाच हें सोनें हिंदुस्थानांत देण्यांत यावें. ह्या पेपरकरन्सी रिझर्व्हची विलायतेंत जी शाखा आहे, तिच्यामध्यें सोनें किती ठेवावयाचें तें हिंदुस्थानांत नाण्यांचा किती सांठा आहे ह्यावर अवलंबून राहील. हिंदुस्थानांत रुपये जर भरपूर असतील व त्या मानानें सोनें तितकें विपूल नसेल, तर विलायतेंत स्टेट सेक्रेटरीनें ५० लाख पौंडांच्या किंमतीहून जास्त सोनें जवळ ठेवूं नये व आणीबाणीच्या वेळीं हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याकरितां

ह्या रकमेवर मुख्य मदार न ठेवतां 'गोल्ड स्टँडर्ड' नांवाचा जो निधि आहे, त्यावर-विशेषतः त्या निधींत असलेल्या सोन्यावर-ठेवावी. ह्या ५० लाख पौंडापेक्षां जी जास्त रक्कम जमेल, तिचा उपयोग रुपये पाडण्याकरतां चांदीची खरेदी करण्याचे कामीं व्हावा. ह्याचा अर्थ असा कीं, ह्या जादा रकमेचा विनियोग हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याचे कामीं करावयाचा नाहीं, तर लोकांना लागतील तेवढीं नाणीं पुरविण्याकडे करावयाचा.

वरील सूचनांचा यथार्थपणा कितपत होता हें आपण महायुद्धामुळें हिंदुस्थानांत जी परिस्थिति उत्पन्न झाली, त्या परिस्थितीवरून पाहूं.

**(५२) युद्धकालीन चलनी नोटांचा प्रसारः**—महायुद्धाचा आरंभ झाल्यावर पहिली गोष्ट ही घडली कीं, व्यापार विस्खलित होऊन लोक नोटांबद्दल रुपये मागूं लागले. पण लोकांचा विश्वास पुनः कायम राहून रुपयांची मागणी कमी कमी होत चालली. १९१५ व १९१६ सालीं सरकारकडून करन्सी ऑफिस, जिल्ह्यांतील खजिने व प्रेसिडेन्सी बँकांच्या जेथें जेथें शाखा असतील त्या त्या ठिकाणीं नोटांबद्दल रुपये देण्यांत येऊं लागले. पण पुढें पुढें चांदीचा पुरवठा कमी झाल्यामुळें रुपये पुरविणें कठीण होऊं लागलें. नोटांचा प्रसार १९१४ पासून १९१५ पर्यंत ६६ कोटींपासून १५३ कोटि रुपयांपर्यंत वाढला व ज्या नोटा ठिकठिकाणचे खजिने व प्रेसिडेन्सी बँकांचीं मुख्य ऑफिसें ह्यांत ठेवण्यांत आलेल्या नव्हत्या, त्या नोटांचा प्रसार ५० कोटींपासून १३४ कोटि रुपयांपर्यंत वाढला. १९१७ व १९१८ सालीं एक रुपयाची व २॥ रुपयांची नोट सुरू करण्यांत आली व त्यांचा प्रसार अनुक्रमें १७ कोटि ५० लक्ष व १ कोटि ६६ लक्ष रुपयांपर्यंत होता. रुपये दुर्मिळ झाल्यामुळें ताग व कापूस विकत घेतांना युरोपियन व्यापाऱ्यांना, येथील शेतकरी व व्यापारी लोकांना ह्या नोटांच्या रूपानें पैसे द्यावे लागले व लोकांनीं मोठ्या नाखुषीनें त्या नोटा स्वीकारल्या. सरकारनें सर्व कारभार नोटांवरच भागविण्याचें मुख्य कारण असें होतें कीं, रुपये अगोदरच लोकांना देण्यांत खलास झाल्यामुळें मुख्य चलनी ऑफिसांत ते शक्य त्या रीतीनें सांठवून ठेवणें अगत्याचें होतें. कारण ह्या ऑफिसांत ज्या

नोटा येतील, त्यांबद्दल रुपये पटविलेच पाहिजेत, असा कायदा आहे. हे रुपये मुख्य करन्सी ऑफिसांत लवकर सांठविले जावेत म्हणून रेल्वेनें, पोस्टांतून व जहाजांतून रुपये पाठविण्याची बंदी करण्यांत आली. अशा तऱ्हेनें रुपयांचा प्रसार बंद होऊन नोटांचा प्रसार फार झाल्यामुळें पहिला परिणाम असा झाला कीं, ह्या नोटा पुष्कळ लोकांच्या हातून पुष्कळ ठिकाणीं गेल्यामुळें त्यांची किंमत उतरूं लागली व १ रुपयाची नोट घेऊन बाजरांत गेलें तर त्याची किंमत १५ आणे होऊं लागली व दुसरा परिणाम असा झाला कीं, चिल्लर नाण्याची फारच मागणी लोकांकडून होऊं लागली. हीं चिल्लर नाणीं म्हणजे एक आणेली, दोन आणेली, पावली वगैरे त्या वेळीं मुळांतच अपुरीं होतीं व त्यांना फार मागणी आल्यामुळें तीं जास्तच दुर्मिळ होऊं लागलीं.

(५३) **बॅबिंग्टन स्मिथ कमिटीच्या सूचनाः**—अशी परिस्थिति प्राप्त झाली असतांना बॅबिंग्टन कमिटीची नेमणूक झाली. एकंदर परिस्थितीचा विचार करून कमिटीनें पेपरकरन्सीच्या बाबतींत असें ठरविलें कीं,

(१) एकंदर जितक्या किंमतीच्या नोटा (Gross Circulation) प्रसारांत असतील त्याच्या २/५ किंमतीचीं सोन्याचांदीचीं नाणीं किंवा सोनेंचांदी ह्यांच्या लगडी मिळून असावीत.

(२) चलनी नोटांच्या मोबदला ठेवलेल्या रकमेंतून जे रोखे विकत घेऊन ठेवलेले असतात, त्यांपैकीं फक्त वीस कोटींचे रोखे हिंदुस्थान सरकारनें काढलेले व बाकीचे रोखे ब्रिटिश साम्राज्यांतील इतर सरकारांनीं काढिलेले असावे. ह्यांपैकीं १० कोटींचे रोखे एका वर्षाच्या मुदतीचे असावे व बाकीच्या रोख्याबद्दल कांहीं ठराविक मुदतीनें पैसे मिळण्यासारखे असावेत; ह्या तीस कोटींपेक्षां जास्त किंमतीचे रोखे सुद्धां ब्रिटिश साम्राज्यामधील सरकारांनीं काढलेले व एका वर्षाचे आंत मुदतीचे असावेत व हल्लीं जी रोख्यांच्या किंमतीची मर्यादा कायद्यानें १२० कोटींपर्यंत ठरविली आहे ती कांहीं वेळपर्यंतच राहूं द्यावी.

( ३ ) ह्या रिझर्व्हमध्यें जें सोनें किंवा इतर रोखे आहेत, त्यांची रुपयांस दोन शिलिंग ह्या भावानें पुनः किंमत ठरवावी व जें नुकसान येईल तें भरून काढणें एकदम जरी शक्य नसलें तरी हुंडणावळीचा भाव वाढल्यामुळें हिंदुस्तान सरकारास जो फायदा होईल त्यांतून हें नुकसान भरून काढितां येईल.

( ४ ) हंगामाचे वेळीं लोकांना जी नाण्याची जास्त जरूर लागते, ती भागविण्याकरितां निर्गत मालावर दिलेल्या अदलाबदल करतां येणाऱ्या हुंडीच्या तारणावर प्रेसिडेन्सी बँकांना कर्ज म्हणून नेहमींच्या नोटांहून (ज्या नोटांच्या मोबदला ठेवलेल्या रकमेंतून रोखे घेऊन टेवलेले असतात अशा नोटांहून) ५ कोटींपर्यंत जास्त किंमतीच्या नोटा काढण्यांत याव्यात.

( ५ ) तातडीच्या कारणाशिवाय होतां होईल तों ह्या रिझर्व्हमधील सोनें व चांदी हिंदुस्थानांतच ठेवण्यांत यावी.

( ६ ) परिस्थिति अनुकूल झाली म्हणजे नोटांबद्दल रुपये देण्याची व्यवस्था व्हावी व हल्लींची बंदी काढून टाकण्यांत यावी.

( ७ ) ह्या नोटांबद्दल रुपये किंवा सान्हरिन द्यावयाचे, हें हिंदुस्थान सरकारच्या मर्जीवर अवलंबून रहावें.

लढाई सुरू झाल्यापासून कांहीं विशिष्ठ किंमतीच्या नोटांचा प्रसार जास्त झाला आहे. उदाहरणार्थ, ५,१० व १०० रुपयांच्या नोटा जास्त लोकप्रिय झालेल्या आहेत व ह्या रुपयांहून जास्त किंमतीच्या नोटा, उदाहरणार्थ १०००० रुपये किंमतीच्या नोटांचा प्रचार कमी कमी होत चालला आहे.

( ५४ ) **१९०७ चा पेपरकरन्सी अमेंडमेंट ॲक्टः**—आतां एका नवीन पास झालेल्या कायद्याचा उल्लेख करून हें ' पेपरकरन्सी रिझर्व्ह ' प्रकरण संपवूं. हा कायदा म्हणजे ' पेपरकरन्सी अमेंडमेंट ' कायदा होय. हा कायदा मागचे वर्षीच पास करण्यांत आला व ह्या कायद्यांत बॅबिंग्टन कमिटीनें केलेल्या सूचना समाविष्ट केलेल्या आहेत. ह्या ' पेपरकरन्सी रिझर्व्ह 'ची कायमची घटना तयार करण्याकरितां ह्या कायद्यानें कांहीं जुजबी उपाय सुचविले

आहेत. रिझर्व्हच्या कायमच्या घटनेंत संबंध रिझर्व्हकरितां शेंकडा ५० टक्के तरी सोन्याचांदीच्या धातूंचा किंवा नाण्यांचा आधार असावा, अशी व्यवस्था केलेली आहे. १९१० सालच्या कायद्यान्वयें तारणांचा आधार असलेल्या नोटांची किंमट १४ कोटींपर्यंत असावी व ह्या १४ कोटि किंमतीच्या तारणांपैकीं विलायत सरकारच्या स्टर्लिंग सिक्युरिटीज चार कोटींहून जास्त किंमतीच्या नसाव्या असें ठरलें होतें. पण हल्लीं पहावें तों ही संख्या ६९ कोटींपर्यंत गेलेली आहे व हा जर कायदा बदलला नाहीं, तर ५५ कोटींच्या नोटा रद्द केल्या पाहिजेत. ही आपत्ति टळावी म्हणून हा नवीन कायदा पास केला गेला. बॅबिंग्टन कमिटीच्या मतें सोन्याचांदीच्या धातूचीं नाणीं नोटांच्या किंमतीच्या मानानें शेंकडा ४० ह्या प्रमाणांत असावींत. सरकारनें शेंकडा ५० हें प्रमाणांत ठरविलें आहे. नोटांचें सोन्याचांदीचे हें प्रमाण किती असावें, ह्याबद्दल मतभेद होऊं शकेल, तसेंच महायुद्धाचे पूर्वी ह्या दोघांचें प्रमाण शेंकडा ७५ होतें ही गोष्ट खरी आहे; तरीं पण एकंदर विचार करतां ह्या नोटांप्रीत्यर्थ इतकी सोनेंचांदी अडकावून ठेवणें इष्ट नाहीं.

ह्या कायद्यांत दुसरा मुद्दा असा आहे कीं, हिंदुस्थानांत २० कोटींच्या ज्या सिक्युरिटीज आहेत, त्यांशिवाय फक्त १२ महिन्यांच्या मुदतीच्या विलायती सिक्युरिटीज बाकीच्या किंमतीच्या असाव्यात. ह्या २० कोटींपैकीं १२ कोटींच्या हिंदुस्थान सरकारनें काढिलेल्या असाव्या व बाकीच्या ८ कोटि थोड्या मुदतीच्या असाव्यात. कदाचित कोणी असें म्हणतील कीं, ह्या २० कोटींचे तारण रोखे तितक्याच किंमतीच्या त्याच सरकारनें काढलेल्या नोटांच्या जोरावर काढले जाणार, म्हणजे त्यांवर आणीबाणीचे वेळीं फारसा विश्वास टाकून काम भागणार नाहीं. ही भीति कांहीं खोटी नाहीं; पण ज्या वेळीं सरकार जास्त प्रमाणांत नोटा काढील त्याच वेळीं ही भीति खरी ठरेल.

ह्या कायद्यांत व्यापाराच्या सोयीचे दृष्टीनें तिसरा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. तो असा कीं, जरूर पडेल तेव्हां तीन महिन्यांच्या मुदतीच्या उत्कृष्ट खातरीच्या हुंड्यांच्या तारणावर पांच कोटींपर्यंत किंमतीच्या नोटा व्यापाराचे

सोयीकरितां काढण्याचा अधिकार सरकारला ह्या कायद्यान्वयें मिळाला आहे व विलायतेंत जें सोनें ठेवावयाचें तें ५० लाख पौंडांवर ठेऊं नये असें ठरलेलें आहे.

सामान्यपणें विचार करतां ह्या कायद्यांतील मुद्दे सर्वांना पटण्यासारखेच आहेत. ह्या कायद्यामुळें चलनी नोटांची सुरक्षितता कायम राहून शिवाय नोटांच्या प्रसाराला जास्त लवचिकपणा आलेला आहे. पेपरकरन्सी रिझर्व्ह-मधील ज्या सिक्युरिटीज आहेत, त्यांची पुन: हल्लींच्या परिस्थितींत किंमत ठरविण्याची सूचनाही फार चांगली आहे. मात्र ही नवी किंमत ठरवितांना जर कांहीं सिक्युरिटींची किंमत उतरल्यामुळें नुकसान येईल, तर तें भरून काढण्या-करतां आजपर्यंत जें व्याज ह्या सिक्युरिटीजवर मिळालें असेल त्या व्याजाचाच उपयोग करण्यांत यावा. हिंदुस्थानावर जादा खर्च लादूं नये किंवा सुवर्ण गंगा-जळीमध्यें ४ कोटि पौंडांची भरती झाल्यावर त्यावर जें व्याज येईल त्यांतून हें नुकसान भरून काढूं नये. ह्या गंगाजळीचा उपयोग हुंडणावळीच्या भावाचेच कामीं झाला पाहिजे. ह्या कारणाव्यतिरिक्त इतर कामाकरितां जर ह्या ठेवीचा उपयोग होऊं लागला, तर उद्यां हिंदुस्थानांत रेल्वेची वाढ करण्याकरितां युरो-पियन कंपन्यांस कर्ज देण्याचेहि कामीं ह्या ठेवीचा उपयोग होऊं लागेल. हिंदुस्थानांत कृत्रिम रुपये सुरू करून त्यावर नफा घेऊन जो पैसा विलायतेंत न्यावयाचा त्याचा भलत्याच कामीं उपयोग होऊं लागेल व ज्या वेळीं आयात माल जास्त आल्यामुळें विलायतच्या व्यापारांना हिंदुस्थानांतूनच पैसे जास्त द्यावयाचे असतात, त्या वेळीं हुंडणावळीच्या भावांत चलबिचल होऊन हिंदु-स्थान सरकारला स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या विकण्याची पाळी येईल. ही स्थिति ज्या वेळीं १ रुपयास २४ पेन्स हें प्रमाण ठरविण्यांत आलें, त्या वेळींच उत्पन्न होईल असें अनुमान करण्यांत आलें होतें व तें अनुमान खरें ठरलेंहि व त्यामुळें हिंदुस्थानच्या लोकांना नाहक ३५ कोटींचा भूर्दंड सोसावा लागला.

---

# भाग आठवा.

—:-×०×-:—

## सोन्याचें नाणें.

(५५) **सोन्याचें नाणें हिंदुस्तानांत सुरू न करण्याबद्दलचीं सरकार पक्षीयांचीं कारणें:**—आपण वर पाहिलेलेंच आहे कीं, हिंदुस्थानांत मुख्य नाणें रुपयाचें आहे व विलायतेमध्यें ज्यावेळीं तेथील व्यापाऱ्यांस पैसा द्यावा लागतो त्यावेळीं सोन्याचा उपयोग होत असतो; किंवा स्टेट सेक्रेटरीला विलायतेमधील आपल्या इंडिया कौन्सिलला लागणाऱ्या खर्चाबद्दल जेव्हां पैसे लागतात तेव्हां त्याला ते साव्हरिनमध्यें मिळतात. हिंदुस्थानांत जी हल्लीं विलक्षण महागाई झाली आहे त्या महागाईचें एक असें मुख्य कारण आहे कीं, हिंदुस्तानांत हल्लीं कृत्रिम रुपयाचा (Token Coin) प्रसार आहे. जगांतील प्रमुख देशांत सोन्याचें नाणें सर्रास चालू असतां हिंदुस्तानसारख्या देशांत—कीं ज्याला प्राचीन काळापासून सुवर्णभूमि अशी संज्ञा होती—सोन्याचें नाणें असणें फार जरूर आहे व तशी लोकांची फार दिवसांपासून मागणी आहे; पण विलायत सरकार व विलायतेचे व्यापारी ह्यांच्या आग्रहामुळें ही मागणी पुरी होऊं शकत नाहीं. ह्या देशांत सोन्याचें नाणें कां सुरू करूं नये ह्याबद्दल सरकार कारणें सांगत असतें. तीं कारणें कोणचीं आहेत ह्याबद्दल आपण आतां विचार करूं.

(१) सोन्याचें नाणें कां सुरू करावयाचें ? तर एकदां त्याचा असा प्रचार सुरू झाला म्हणजे लोकांची सांठवून ठेवण्याकडे जी प्रवृत्ति होते ती होणार नाहीं व बरेंच सोनें बाहेर काढण्यांत येईल व त्याचा उद्योगधंद्यांत उपयोग होईल. त्याचप्रमाणें चलनी नाणें अशा दृष्टीनें चांदीच्या नाण्यापेक्षां सोन्याचें नाणें अधिक उपयोगी असतें व आणीबाणीच्या वेळीं तें हुंडणावळीचा भाव टिकवूं

शकतें. पण वस्तुःस्थिति अशी आहे कीं, जितक्या जास्त प्रमाणांत सोन्याचें नाणें प्रचारांत असतें तितक्याच प्रमाणांत हुंडणावळीचा भाव उतरत असतांना ही नाणीं लोक दडपून ठेवतात व त्यामुळें ह्या नाण्यांचा तो भाव कायम ठेवण्याचे कामीं फारसा उपयोग होत नाहीं. चेंबरलेन कमिशन म्हणतें कीं, ' जसजसा सोन्याचीं नाणीं लोकप्रिय करण्याचा सरकारनें प्रयत्न करावा तसतसे लोक हीं नाणीं सांठवूं लागतात. विशेषतः ज्यावेळीं व्यापारीविषयक आणीबाणीची वेळ असते व लोकांत विश्वास उडून जातो त्यावेळीं हीं नाणीं सांठविण्याची प्रवृत्ति स्पष्टपणें दिसून येते.' जिनसांचीं अदलाबदल करण्याचें साधन म्हणून सोन्याचें नाणें रुप्याच्या नाण्यापेक्षां खरोखरच जास्त चांगलें असतें. पण ह्याला एक मुख्य अट अशी आहे कीं, ह्या सोन्याच्या नाण्याचा उपयोग मोठमोठ्या रकमा देण्याचे कामीं विशेष होत असतो व हीं देणीं नोटांचे द्वारा फिटण्यासारखीं नसतात. नित्यांतला व्यवहार हा नेहमींच रुपयांच्या द्वारा करावयाचा असतो व ज्यावेळीं हुंडणावळीचा भाव उतरत असतो त्यावेळीं तो थोपवून धरण्याकरितां हे रुपयेच उपयोगी पडत असतात. कारण सोन्याचीं नाणीं कांहीं बाहेर पाठविलीं जाणार नाहींत, तर रुपयेच बाहेर पाठवावे लागणार. सोन्याचा प्रसार जर जास्त प्रमाणांत करावयाचा असेल तर सुवर्णनिधि किंवा ' पेपर करन्सी-रिझर्व्ह ' मधील सोनें काढूनच करावा लागेल. व ज्यावेळीं लोकांचा विश्वास उडून जातो त्यावेळीं ह्या सोन्याचा फारसा उपयोग होणार नाहीं. कारण त्याची तूट त्यावेळीं भासूं लागेल. लोकांना वारंवार लागणाऱ्या नवीन रुपयांच्या ऐवजीं जर सोन्याच्या नाण्याचा उपयोग होऊं लागला तर हें नाणें सुवर्णनिधींतूनच काढावें लागेल व कृत्रिम रुपये पाडून होणाऱ्या फायद्यांतून सुवर्णनिधीची जी वाढ व्हावयाची तीस सरकारला मुकावें लागणार. तात्पर्य, सोनें जर लहान प्रमाणांत प्रचारांत असेल तर हुंडणावळीचा भाव उतरत असतांना त्याचा फारसा उपयोग नाहीं; व विस्तृत प्रमाणांत जर त्याचा प्रसार व्हावयाचा असेल तर सुवर्णनिधींतून किंवा पेपर करन्सी रिझर्व्हमधून तो करावा लागेल व आणीबाणीचे वेळीं सोनें गडप होऊन दुर्मिळ होऊं लागल्यामुळें त्याचा फारसा उपयोग हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याचे कामीं होणार नाहीं.

( २ ) हिंदुस्तानांत काय किंवा इंग्लंडमध्यें काय लोकांचे उद्योग-धंद्यांतले व्यवहार सोन्याचे साहाय्यानें फारच थोडे होत असतात. हेच व्यवहार जर सोन्यांत करावयाचे असतील तर त्याचा असा परिणाम होईल कीं, त्यामुळें रुपये व चलनी नोटा ह्या मागें पडतील. वस्तुतः पाहिलें असतांना नोटा ह्या चलनाचे व वापरण्याचे कामीं फार सोयीच्या आहेत व त्या जर मागें पडत चालल्या तर लोकांची फार गैरसोय होईल.

( ३ ) कांहीं लोकांचें असें मत आहे कीं, ज्या देशांत सोन्याचें नाणें प्रचारांत असतें त्या देशाला जगाच्या बाजारपेठांत मोठा मान असतो. इंग्लंड-मध्यें जर लढाईचे पूर्वीं सोन्याचें नाणें सुरू होतें तर हिंदुस्ताननेंच काय घोडें मारलें आहे? ह्या विचारसरणींत दोन मुद्यांकडे दुर्लक्ष केलेलें आहे. पहिला मुद्दा असा आहे कीं, इंग्लंडच्या चलनी पद्धतींत साव्हारिनचें फारसें महत्व नाहीं. इंग्लंडचें व्यापारी महत्व सोन्याच्या नाण्यावर अवलंबून नाहीं तर तेथें जिन-सांची किंमत सोन्यामध्यें ठरविण्यांत येणें; विस्तृत प्रमाणांत पेढयाची पद्धति सुरू असणें; व पेढयांनीं काढलेले चेक व बँक आफ् इंग्लंडच्या नोटा ह्यांचा प्रसार असणें ह्या गोष्टींवर तें महत्त्व अवलंबून आहे. ह्या गोष्टी लक्ष्यांत ठेवल्या असतां आपणांस असें दिसून येईल कीं, सोन्याच्या नाण्याचा सरास प्रसार केल्यापेक्षां जर सोनें सरकारी खजिन्यांत सांठवून ठेवलें तर तें जास्त फायदेशीर आहे. जेवढें सोनें दागिने वगैरेकरितां लागेल तेवढें विक्रीकरितां काढून बाकीचें सरकारी तिजोरींत किंवा पेढयांच्या खजिन्यांत सांठविण्यांत यावें व देशांतल्या देशांत लागणाऱ्या पैशाचें काम रुपयांवर व नोटांवरच भागवावें हीच शास्त्रशुद्ध पद्धति होय.

( ५६ ) **वर सांगितलेल्या कारणांबद्दल चर्चाः**—अशा प्रकारची विचारसरणि सरकार व तत्पक्षीय लोक हे नेहमीं स्वीकारीत असतात. पण थोडा सूक्ष्म विचार केला असतां ही विचारसरणि किती फोल आहे हें चटकन समजून येईल. ह्या लोकांचा मुख्य कटाक्ष असा आहे कीं, हिंदुस्तानचे लोक नेहमीं सोन्याचा गुप्त संचय करीत असतात. जितकें सोनें जास्त प्रचारांत

आणावें तितकें जास्त हे लोक तें जमीनींत पुरून ठेवतात किंवा दागिने वगैरे जिनसा करण्यांत फस्त करितात. वस्तुतः हा गुप्त संचय करण्याचा आरोप निर्मूल आहे. निदान त्यांत अतिशयोक्ति तरी फार आहे. ए. सी. चतर्जी ह्यानीं एक ठिकाणीं असें स्पष्ट सिद्ध केलें आहे कीं, हिंदुस्तानांत अगणित गुप्त संचय आहे ही झूट बात आहे. वस्तुस्थिति पाहिली तर एवढेंच म्हणतां येईल कीं, दर माणसीं फार तर पांच रुपये सांठविले जात असतील. इतकेंच नव्हे तर सरकार व तत्पक्षीय टीकाकार ह्यांचा अंदाज स्वीकारला तरी दर माणसीं २५ रुपयांहून ही संचयाची रकम जास्त होत नाहीं. इतर देशांत गुप्तसंचय करण्याची जी प्रवृत्ति दिसून येते त्या मानानें येथील लोकांची प्रवृत्ति फारशी गर्हणीय आहे असें वाटत नाहीं. एकंदर सर्व हिंदुस्तानांत सांठविलेली अतएव व्यापारांत न घातलेली रकम घेतली तर आपणांस असें दिसून येईल कीं, ह्या रकमेचा बहुतेक भाग राजेराजवाडे व जमीनदार लोक ह्यांच्या दागदागिन्यांत व सोन्याचांदीच्या भांड्यांतच गडप झालेला असतो व ह्याबद्दल सामान्य लोकांना जबाबदार धरतां येत नाहीं. मनुष्यस्वभावच असा आहे कीं, डामडौल करावा, आपलें वैभव लोकांस दाखवावें, व शरीर अलंकृत करावें; तेव्हां जगांतील इतर लोकांना वगळून फक्त हिंदुस्तानच्या लोकांस दोष देणें हा निव्वळ पक्षपात होय.

हिंदुस्थानचे लोक आपल्या बायकांच्या अंगावर किंवा लहान मुलांचे अंगावर दागिने घालतात व अशा रीतीनें रानटीपणाचें प्रदर्शन करितात असा त्यांचेवर पाश्चात्य लोकांचा आरोप आहे; पण हे दागिने म्हणजे एक प्रकारची ठेवच होय. प्रसंग पडला असतांना हे दागिने विकून चटकन् पैसे उत्पन्न करितां येतात. हिंदुस्थानचे लोकच दागिन्याचे पायीं लाखों रुपये खर्च करि-तात ही गोष्ट जरी खरी असली तरी पाश्चात्य लोक आपल्या बायकांचे चोचले पुरविण्याकरितां पैसे खर्च करीत नाहींत असें थोडेंच आहे. शिवाय आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, एकेकाळीं हा देश संपत्तीचें माहेरघर अस-ल्यामुळें व हल्लींच्यासारखी शांतता व सुरक्षितता त्यावेळीं लोकांस नसल्यामुळें लोकांची प्रवृत्ति गुप्तपणें संचय करणें व दागिने करणें ह्यांकडे साहजिकच होती.

आतां शिक्षणप्रसार वाढत आहे व व्यापारधंद्याला साधनें जास्त अनुकूल असल्यामुळें लोकही आपले पैसे पोष्टांत किंवा पेढ्यांत ठेऊं लागले आहेत.

पण सरकार असें म्हणतें कीं, हें तुमचें म्हणणें आम्हांस कबूल आहे; पण येथील लोक गरीब आहेत त्यांची वाट काय? लोकांची प्राप्तीच जर थोडी आहे तर त्यांना सोन्याच्या नाण्याची जरूरी काय? जितकीं जास्त सोन्याचीं नाणीं आणण्याचा प्रयत्न करावा तितक्याच प्रमाणांत हीं नाणीं गडप होऊन पुनः रुपयेच प्रचारांत येतात ही गोष्ट खरी नाहीं काय? ह्यावर आमचें असें म्हणणें आहे कीं, लोकांना सोन्याचीं नाणीं नकोत ही गोष्टच खोटी आहे. पूर्वीं हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें नव्हतें व आतांच तें सुरू करावयाचें आहे असें थोडेंच आहे. फार प्राचीन काळापासून ह्या देशांत सुवर्णासारखीं नाणीं लोकप्रिय होतीं. ही प्राचीन स्थिति सोडून देऊन अर्वाचीन स्थितीकडे जरी आपण नजर फेंकली तरी आपण पाहतों कीं, दक्षिण हिंदुस्थानांत सोन्याच्या मोहरेचा फार प्रसार होता. न्या. रानडे हे एके ठिकाणीं म्हणतात कीं, हिंदुस्थानांत १५० वर्षांपूर्वीं मोंगली राजसत्ता व मराठी राजसत्ता सुरू असतांना जर लोकांना सोन्याच्या नाण्याची संवय होती तर आतां पेढ्या देशांत वढत असतांना व उद्योगधंदे व व्यापार ह्यांची वृद्धी होत असतांना लोकांना रुपयेच झेंपतील व साव्हरिन झेंपणार नाहींत हें म्हणणें चुकीचें होईल. लोक गरीब आहेत तर १५ रुपयांचा साव्हरिन सुरू न करितां १० रुपयांचा व ५ रुपयांचा अर्धा साव्हरिन सुरू करा. इंग्लंडमध्येंसुद्धां चिल्लर कामांकरितां रुप्याच्या नाण्याचा उपयोग करण्यांत येतो व मोठ्या व्यवहारांत सोन्याच्या नाण्यांचा व नोटांचा उपयोग होत असतो तसाच प्रकार येथें होईल.

सोन्याच्या नाण्यांचा संचय होऊन तीं अदृश्य होतात त्यांचें खरें कारण असें आहे कीं, ह्या देशांत मुख्य नाणें रुपयाचें आहे व दुय्यम नाणें साव्हरिन आहे. ह्या दोन्ही नाण्यांची मूळ किंमत व कायद्यानें ठरविलेली किंमत जर सारखी असती तर फार चांगलें झालें असतें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, येथील रुपयाची १६ आणे किंमत ही कृत्रिम आहे व मूळ किंमत १० आणे आहे.

त्यामुळें व्यवहारांत सोन्याचीं व चांदीचीं नाणीं प्रचारांत येऊं लागलीं म्हणजे ग्रेशामच्या नियमान्वयें हलकीं नाणीं चांगल्या नाण्यांना हांकून देतात व रुपयाचें हलकें नाणें म्हणजे कृत्रिम खोटें नाणें कायम राहून सोन्याचें नाणें अदृश्य होतें. ही जर आपत्ति टाळावयाची असेल तर त्याला खरा उपाय म्हणजे रुपयाचें नाणें चिल्लर व दुय्यम करून सर्व भिस्त सोन्याच्या नाण्यावरच ठेवावी व तींच नाणीं सर्रास सुरू करावीं. हल्लीं सोन्याचीं नाणीं थोडीं आहेत म्हणून तीं सांठवून ठेवावीशीं वाटतात. पण तींच जर मुबलक प्रचारांत असलीं तर तीं लोकांस विशेष महत्वाचीं वाटणार नाहींत. सोन्याच्याच नाण्याची गोष्ट कशाला? महायुद्ध सुरू असतांना रुपये दुर्मिळ होऊं लागतांच ते सांठवून ठेऊन लोक कागदी नोटांवरच काम भागवूं लागले. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, सोन्याच्या नाण्यांचा प्रचार सरकाराकडून करण्यांत आल्याबरोबर तीं गुप्त संचित होतात ह्याचा दोष सरकाराकडेच येतो.

वर दिलेलें सरकारचें पहिलें कारण वाचलें असतां आपणांस एक गोष्ट दिसून येईल कीं, सरकारची सर्व खटपट हुंडणावळीचा भाव कायम कसा राहील ह्याबद्दल असते. हिंदुस्थानांत कोणतें नाणें सुरू केलें असतां लोकांचा फायदा होईल ह्या गोष्टीचा विचार न करतां विलायतेच्या व्यापाऱ्यांना येथें पैसे स्वस्त भावानें कसे पाठवितां येतील हीच गोष्ट सरकारास जास्त महत्त्वाची वाटते. सरकार सर्वज्ञ आहे; त्यास आम्हीं सांगावें असें नाहीं. पण ज्या वेळीं सरकार मुद्दाम जाणूनबुजून दुर्लक्ष करतें त्यावेळीं खरी गोष्ट व्यक्त करावी लागते. ती ही कीं, पैशाचे तीन प्रकारचे उपयोग आहेत. पहिला उपयोग असा आहे कीं, जिनसांची किंमत पैशानें ठरविली जाते. दुसरा उपयोग म्हटला म्हणजे ह्यावेळीं एखादा जिन्नस विकत घेतला व त्याची किंमत कांहीं कालानें द्यावयाची असली तर ती किंमत ह्या पैशाच्या रूपानें देतां येते; तिसरा उपयोग म्हटला म्हणजे वस्तूंची अदलाबदल सुलभ करण्याचें साधन पैसा होय. तेव्हां सरकारनें ह्या तिसऱ्याच उपयोगावर नेहमीं जोर देणें अनिष्ट आहे. हिंदुस्थान सरकारला स्टेट सेक्रेटरीला जे रुपये पाठवावयाचे असतात तेवढयाबद्दल स्टेट सेक्रेटरीनें जर हुंड्या विकावयास काढल्या तर आमची हरकत

नाहीं. पण स्टेट सेक्रेटरी व विलायतेचे व्यापारी हे सगोत्र असल्यामुळें हुंड्या अधिक विकल्या जातात व हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याची सरकारास धडपड करावी लागते.

हल्लीं हिंदुस्थानांत जी गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डची पद्धत आहे ती धड ना घोडा ना गाढव अशा प्रकारची आहे. ह्या पद्धतींत मुख्य दोष असा आहे कीं, ती स्वाभाविक नाहीं व ज्या वेळीं व्यापाराची तेजी असते त्यावेळीं चलनी नाण्यांचाच प्रसार होतो. एकदां हा प्रसार फार झाला म्हणजे मंदीच्या वेळीं हीं नाणीं कमी न झाल्यामुळें किंमती विनाकारण वाढतात व त्यामुळें गिऱ्हाई-कांचें नुकसान होतें. शिवाय गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डची आवश्यकता येथें नस-ल्यानें लोकांचें अपरिमित नुकसान झालेलें आहे. ज्या ठिकाणीं सोन्याचा पुरवठा फारसा नसतो त्या ठिकाणीं ही पद्धति तुम्ही सुरू करा; पण जेथें सोनें मुबलक आहे व आयात मालापेक्षां निर्गत माल जास्त असल्यामुळें जेथें लोकांना सोनें मागण्याचा हक्क आहे तेथें तुम्ही सोन्याचें नाणें प्रचलित करून सोन्याचा उपयोग करूं देत नाहीं हा न्याय कोठला? इतर सर्व सुधा-रलेल्या राष्ट्रांत ( चीन देश वगळून ) जर सोन्याचें नाणें सुरू आहे तर हिंदुस्थानांतच येथील व्यापाऱ्यांच्या हातांत रुपये द्यावयाचे व विलायती व्यापाऱ्यांस तेवढीं सोन्याचीं नाणीं द्यावयाचीं हा उघड उघड अन्याय आहे. रुपयाची किंमत १६ पेन्स किंवा २४ पेन्स अशी कृत्रिम ठरविल्यानें विलायती मालांस कृत्रिम फाजील मागणी येऊन येथील व्यापारास, किंमती विनाकारण वाढल्यामुळें व मालास मागणी न आल्यामुळें, केवढा धक्का बसतो ह्याचा अनु-भव लोकांस नुकताच आलेला आहे; व रुपयाची कृत्रिम किंमत कायम ठेवण्या-करितां ३५ कोटी रुपयांची ठोकर हिंदुस्थानास कशी बसलेली आहे हेंही कोणास नवीन सांगावयास नको. सर्व नाण्यांचा विचार करतां सोन्याचें नाणें केव्हांही सरस ठरेल. सोनें हें केव्हांही सर्वांत जास्त किंमतीचें रहणार; त्यामुळें त्यावर लोकांचा नेहमीं विश्वास बसणार व व्यवहारांत देण्याघेण्याचे कामीं तें जास्त सोयीचें असणार. तेव्हां इंग्लंडमध्यें लोक नोटांवरच बहुतेक व्यवहार करितात तसा येथें करून लोकांनीं आपली तहान रुपयांवरच भागवावी असा खोटा

उपदेश लोकांस कसा पटणार ? इंग्लंडचा मोठेपणा व्यापाराचे बाबतींत तरी सोन्याचें नाण्यावर आहे. तो मोठेपणा आपणांस मिळावा म्हणून जर्मनीसारख्या राष्ट्रांनीं आपल्या देशांत चांदीचें नाणें टाकून देऊन सोन्याचें नाणें सुरू केलें. हिंदुस्थानाला मोठेपणा मिळविण्याकरितां जर सोन्याचें नाणें सुरु व्हावें अशी इच्छा झाली तर त्यांत नांवें ठेवण्यासारखें कांहीं नाहीं. सरकारला जर हिंदुस्थानच्या लोकांची खात्री पटवून द्यावयाची असेल तर खुद्द इंग्लंडला रुपयासारखें कृत्रिम नाणें आपल्या देशांत सुरू करण्यास सांगावें व मग येथील लोकांस गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डच्या उपयुक्ततेबद्दल गोष्टी सांगाव्यात. तसें जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत लोक पुरुणांतलीं वांगीं पुराणांतच असें म्हणणार.

---

# भाग ९ वा.

## स्टेट सेक्रेटरीनें विकावयास काढलेल्या हुंड्या.

(५७) **होम चार्जेस म्हणजे काय:—** हिंदुस्थान हें राष्ट्र जरी इंग्लंडनें जिंकलेलें आहे तरी त्या देशाला सार्वभौमसत्तेबद्दल प्रत्यक्ष अशी खंडणी हिंदुस्थानास द्यावी लागत नाहीं. हिंदुस्थानांतलें सर्व उत्पन्न हिंदुस्थानामध्येंच व हिंदुस्थानाच्याच कामाकरितां खर्च व्हावें असा पार्लमेंटचा स्पष्ट कायदा आहे. हिंदुस्थानचा राज्यकारभार येथील गव्हर्नर जनरल जरी पहात असला तरी तो कायद्यानें ब्रिटिश प्रधान मंडळांतील एक सभासद असलेल्या स्टेट सेक्रेटरीला जबाबदार असतो. म्हणजे हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें सर्वस्वीं विलायतेमध्यें बसून स्टेट सेक्रेटरी हलवीत असतो. ह्या सेक्रेटरीला मदत करण्याकरितां व योग्य तो सल्ला देण्याकरितां १४ ते १८ सभासदांचें एक मंडळ असतें व ह्या सल्लागार

मंडळाचा होणारा खर्च हिंदुस्थानच्या खजिन्यांतून होत असतो. त्या खर्चा-शिवाय इतरही पुष्कळ खर्चांच्या बाबी आहेत.

(१) पहिली बाब म्हणजे हिंदुस्थानाकरितां स्टेट सेक्रेटरी कधीं कधीं कर्ज काढीत असतो. त्या कर्जाबद्दल त्याला व्याज द्यावें लागतें. तसेंच रेल्वे व पाठबंधारे ह्यांच्याबद्दल दरसाल कांहीं रकम स्टेट सेक्रेटरीस द्यावी लागते; ह्या सर्वांप्रीत्यर्थ होणारा खर्च — $१७\frac{१}{२}$ कोटी

(२) लष्करीखातें व मुलकीखातें ह्यांतील अधिकारी विलायतेंत फर्लो घेऊन गेल्यावर त्यांना तेथें मिळणारी रकम — $१\frac{१}{२}$ कोटी

(३) सैन्य व कारभार ह्या खात्यांतील लोकांप्रीत्यर्थ होणारा खर्च — $१\frac{३}{४}$ कोटी

(४) नोकरीची मुदत संपवून हिंदुस्थानांतून विलायतेंत गेल्यावर येथील वरिष्ठ नोकरींतल्या लष्करी व मुलकी कामगारांना मिळणाऱ्या पेन्शनादाखल वगैरे मिळणारी रकम. — ८ कोट

(५) हिंदुस्थानांतील मुलकी खात्याप्रीत्यर्थ विलायतेंत होणारा खर्च — $\frac{१}{४}$ कोटी

(६) हिंदुस्थानाप्रीत्यर्थ लागणाऱ्या मालांवर होणारा खर्च — $२\frac{१}{४}$ कोट

ह्या सर्व खर्चांत इंडिया आफिसचा खर्च — $\frac{१}{४}$ कोट रुपये

मिळविला असतां एकंदर खर्च — $३०\frac{३}{४}$ कोट रुपये

ह्या सर्व खर्चास 'होम चार्जेस' असें विशिष्ट नांव आहे. हा जो खर्च दर वर्षी होत असतो त्याबद्दल सुमारें ३० कोट रुपये ह्या देशांतून बाहेर जातात. त्यामुळें हिंदुस्थानास प्रत्यक्ष नाहीं तरी अप्रत्यक्ष खंडणीच द्यावी लागते. हा जो संपत्तीचा वार्षिक प्रचंड लोट विलायतेकडे अव्याहतपणें कित्येक वर्षें चालला आहे व पुढेंही असाच चालणार त्यामुळें हिंदुस्थान एके काळीं कितीही संपन्न असला

तरी हल्लीं संपत्तीच्या दृष्टीनें कोरडा ठणठणीत पडत चालला आहे. तसेंच हा खर्च म्हणजे हिंदुस्थानच्या दास्याची खूणच आहे. कारण हा देश जर स्वतंत्र असता तर येथील विलायती नोकरांस जें पेन्शन विलायतेंत मिळतें, किंवा हिंदुस्थानांतल्या रेल्वे वगैरेकारतां जें कर्ज विलायतेंत काढण्यांत येतें, व त्यावर भरभक्कम व्याज देण्यांत येतें, त्याप्रीत्यर्थ होणारा खर्च बराच कमी झाला असता; व जो कांहीं खर्च होत आहे तो येथेंच राहिला असता. हें जें मत आम्हीं प्रकट केलेलें आहे त्याला सर थॉमस मनरो व सर जार्ज विंगेट ह्यांच्याही मताची पुष्टि आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, सर्वंच खर्च कांहीं पेन्शन वगैरे देण्यांत होत नाहीं. ३० कोटी रुपयांपैकीं फक्त १२ कोट रुपये ह्या पेन्शन किंवा फर्लोप्रीत्यर्थं खर्च होत असतात. पण हे नोकर जर एतद्देशीय असते तर त्यांना कमी पेन्शन देऊन हा खर्च कमी करण्यांत आला असता. त्याचप्रमाणें बाकीचे जे बावीस कोट रुपये खर्च होतात ते रेल्वेकरितां कर्ज काढल्यामुळें द्याव्या लागणाऱ्या व्याजाप्रीत्यर्थ किंवा इतर सामान घेण्याकरितां खर्च होतात. हेंच सामान येथें घेतलें किंवा हेंच कर्ज सोन्याच्या नाण्यांत न काढितां रुपयांत काढिलें,--फार काय, कर्ज काढून रेल्वेचा प्रसार करावयाचा नाहीं असें जर हिंदुस्तान सरकारनें आपलें धोरण ठरविलें—तर हा खर्च बराच कमी होईल ह्यांत संशय नाहीं. ह्या खर्चाबद्दल लागणारे रुपये पाठविण्याचा सरळ मार्ग म्हटला म्हणजे ते पोष्टानें पाठविणें हा होय. पण ह्या मार्गाचा अवलंब करण्यास दोन अडचणी आहेत. पहिली अडचण ही आहे कीं, हिंदुस्तानांत व विलायतेमध्यें एकच नाणें प्रचलित नाहीं. येथें वास्तविक १० आणे किंमतीची चांदी असलेला पण कायद्यानें १६ आणे किंमत ठरविलेला रूपया प्रचारांत आहे; तर विलायतेंत सोन्याच्या सार्व्हरिनचा प्रचार आहे. त्यामुळें येथून नोकरी संपल्यावर विलायतेस परत जाणारे गोरे अधिकारी आपलें पेन्शन रुपयाच्या नाण्यांत स्वीकारीत नाहींत. दुसरी अडचण अशी आहे कीं, हा सर्व पैसा पोष्टानें पाठवायाचा म्हटलें तर फार खर्चाचें काम होईल. तेव्हां हा सरळ मार्ग सोडून अन्य तऱ्हेनें हा पैसा विलायतेमध्यें पाठविण्यांत येतो. पण ही कोणची तऱ्हा आहे तें समजण्याकरितां थोडी अवांतर माहिती येथें सांगितली पाहिजे.

**(५८) व्यापारी हुंड्या काढण्याची पद्धत:**--एकाच देशांत दोन ठिकाणचे व्यापारी एकमेकांशीं व्यवहार करितांना अर्वाचीन काळीं प्रत्यक्ष नाण्याचा उपयोग थोडाच करीत असतात. पूर्वी ज्या वेळीं व्यापाराची फारशी वाढ नव्हती व ज्यावेळीं दळणवळणाचे मार्ग कमी असत त्यावेळीं मालाची खरेदी करितांना व्यापाऱ्यांस रोख पैसे द्यावे लागत. व्यापार अगदीं बाल्यावस्थेंत असतांना जिनसांनीं जिनसा घेण्याची पद्धत असे. पुढें व्यापार वाढत चालल्यावर पैशाचा उपयोग जिन्नस विकत घेण्याचे कामीं होऊं लागला; पण हल्लीं व्यापाराच्या वाढीची पराकाष्ठा झाल्यावर पुन: जिनसांनीं जिन्नस विकत घेण्याची पद्धत प्रचलित होत आहे. विशेषत: आंतर्राष्ट्रीय व्यापार सुरू असतांना ही प्रवृत्ति स्पष्टपणें व्यक्त होत असते. प्रत्येक देशामध्यें जितका आयात माल येत असतो त्याची किंमत ज्या देशांतून तो येत असतो त्या देशांत आपला माल पाठवून तो देश देत असतो. हेंच तत्त्व अगदीं थोड्या शब्दांत जर सांगावयाचें असेल तर 'आयात मालाची किंमत निर्गत मालाच्या रूपानें देण्यांत येते' ह्या शब्दांत सांगतां येईल. अशा रीतीनें व्यापार सुरू झाला म्हणजे प्रत्यक्ष नाण्यांची जरूर फारच थोडी भासूं लागते.

ज्या दोन देशांत व्यापार चालत असतो त्या देशांतील व्यापारी एकमेकांवर हुंड्या काढीत असतात. आपण अशी कल्पना करूं कीं, मुंबई शहरांतील एक व्यापारी लंडन शहरच्या एका व्यापाऱ्यास गव्हाचीं पोतीं पाठवितो. ह्या गव्हाच्या पोत्यांची किंमत ५ लाख रुपये आहे व ते सहा महिन्यानंतर मिळावयाचे आहेत. तसेंच आपण आणखी अशी कल्पना करूं कीं, विलायतेमधील लोखंडी सामानाचे व्यापारी ह्यांनीं मुंबईच्या दुसऱ्या एका व्यापाऱ्यास तितक्याच म्हणजे ५ लाख किमतीचें लोखंडी सामान पाठविलें आहे व ह्या सामानाचे पैसेही सहा महिन्यांनींच मिळावयाचे आहेत. आतां ह्या उदाहरणांत एका मुंबईच्या व्यापाऱ्याला लंडन शहरांतील एका व्यापाऱ्याकडून पैसे घ्यावयाचें असतात व दुसऱ्या उदाहरणांत दुसऱ्या मुंबईच्या व्यापाऱ्यास लंडनमधील दुसऱ्या व्यापाऱ्यास पैसे द्यावयाचे असतात. अशा वेळीं प्रत्यक्ष

पैसा न पाठविता मुंबईतील लोखंडी सामान खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यानें विलायतेंत गहूं पाठविणाऱ्या व्यापाऱ्याची गांठ घेऊन जर त्याला पैसे भरले व त्यानें विलायतेंतील व्यापाऱ्यावर काढलेली हुंडी घेऊन जर ती तेथील लोखंडी सामान पाठविणाऱ्या व्यापाऱ्याकडे पाठवून दिली; तसेंच ही हुंडी घेऊन तो लोखंडी सामान विकणारा व्यापारी जर हिंदुस्थानचा गहूं खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्याकडे गेला तर त्याला तावडतोब किंवा मुदत भरल्यावर पैसे मिळतील व दोनदां पैसे दोन ठिकाणीं पाठवयाचे असल्यामुळें लागणारा खर्चही वांचेल.

ह्या उदाहरणांत आपण दोन गोष्टी गृहीत धरल्या आहेत. पहिली गोष्ट अशी कीं, मुंबईचा व्यापारी जितक्या किंमतीचा गहूं पाठवितो तितक्याच किंमतीचें लोखंडी सामान विलायतेचा व्यापारी मुंबईच्या दुसऱ्या एका व्यापाऱ्याकडे पाठवितो. दुसरी गोष्ट अशी कीं, व्यापारी एकमेकाला प्रत्यक्ष भेटून हुंड्यांची अदलाबदल करतात. प्रत्यक्ष व्यवहारांत ह्या दोन्ही गोष्टी घडत नाहींत. नेहमीं दोन देशांमध्यें सारख्याच किंमतीचा व्यापार होत नसतो. ज्या वेळीं आयात मालाची किंमत निर्गत मालाच्या किंमतीपेक्षां जास्त असते त्या वेळीं ज्या देशांत तो माल येत असेल त्या देशाला जास्त पैसे पाठवावे लागतात; व त्या देशांत व्यापाराची स्थिति सामान्यपणें समाधानकारक नाहीं असें मानण्यांत येतें. उलट त्याच देशांत आयात मालापेक्षां निर्गत माल जास्त किंमतीचा गेल्या कारणानें जर दुसऱ्या देशाकडून जास्त पैसे घ्यावयाचे असतील तर व्यापाराची स्थिति समाधानकारक आहे असें समजलें जातें. त्याचप्रमाणें व्यापाऱ्यांनीं काढिलेल्या हुंड्या गोळा करून विकणाऱ्या व त्यावर नफा मिळविणाऱ्या पेढ्यासारख्या संस्था किंवा दलाल सर्व देशांत सांपडतात व त्यामुळें व्यापाऱ्यांची सोय उत्तम तऱ्हेनें झालेली आपण पहतों. इंग्लंड देश वगळला तर आपणांस असें दिसून येईल कीं, सर्व देशांत ह्या हुंड्या विकण्याचें काम पेढ्याच करीत असतात.

**(५९) हुंडणावळीचा दर म्हणजे काय?**—हुंड्यांची खरेदी-विक्री करितांना पेढया किंवा दलाल जी किंमत आकारतात तिला हुंडणावळीचा

दर अशी संज्ञा आहे. हा दर कधीं कमी होतो तर कधीं वाढत असतो. ह्याला अनेक कारणें आहेत. पहिलें कारण असें आहे कीं, जर एकच नाणें दोन देशांत प्रचलित असलें तर फारशी अडचण पडत नाहीं; पण जर त्या दोन देशांत भिन्न नाणीं प्रचारांत असलीं तर हुंडणावळीचा दर एक राहूं शकत नाहीं. हीं दोन नाणीं जर एकाच धातूचीं असलीं तर त्या नाण्यांमध्यें ज्या प्रमाणांत ती धातू असेल त्या प्रमाणावर हुंडणावळीचा दर अवलंबून राहील. उदाहरणार्थ, इंग्लिश साव्हरिनमध्यें निव्वळ सोनें ७.३२२३८ ग्रॅम आहे; व फ्रान्सच्या नेपोलियन नांवाच्या नाण्यांत * निव्वळ सोनें ५.८०६४५ ग्रॅम आहे म्हणून दोन देशांमध्यें हुंडणावळीचा दर १ इंग्लिश साव्हरिन= $\frac{७.३२२३८ \times २०}{५.८०६४५}$ फ्रँक= २५ २२१५ फ्रँक आहे. तसेंच एखाद्या देशांत सोन्यानें वस्तूंची किंमत ठरविण्यांत येत असली व तेथें सोन्याचें नाणें प्रचलित असलें; व दुसऱ्या देशांत रुप्याच्या नाण्याचा प्रसार असला तर अशा वेळीं हुंडणावळीचा दर चांदीच्या बाजारांत असलेल्या किंमतीवर अवलंबून राहील. पण सर्वांत प्रबळ कारण म्हटलें म्हणजे हुंड्यांची मागणी व त्यांचा पुरवठा ह्यांचा परस्परसंबंध हें होय. बाजारांत ज्याप्रमाणें वस्तूंच्या मागणीवर व पुरवठ्यावर किंमत अवलंबून असते; त्याचप्रमाणें हुंडणावळीचा दर हुंड्यांच्या मागणीवर व पुरवठ्यावर अवलंबून राहतो; व ह्या हुंड्या अर्थात मालाच्या आयातीवर व निर्गतीवर अवलंबून असतात. ज्या देशांत निर्गतीपेक्षां आयात जास्त आहे त्या देशांत हुंडणावळीचा भाव चढलेला असतो; पण त्याच देशांत जर आयातीपेक्षां निर्गत वाढत असली तर तो हुंडणावळीचा भाव उतरूं लागतो. हा सामान्य नियम आपण लक्षांत ठेवला पाहिजे.

एखाद्या देशांत हुंडणावळीचा भाव वाढतो ह्याचा अर्थ असा होतो कीं, त्या देशांत बाहेरून आंत माल आणणाऱ्या व्यापाऱ्यांना त्यांच्या अटकळीचे बाहेर आपल्या हुंड्यांबद्दल जास्त पैसे द्यावे लागतात; म्हणजे थोड्या शब्दांत सांगावयाचें असेल तर हुंडणावळीचा वाढता दर हा आयात मालाला एक प्रकारचा

* एक नेपोलियन म्हणजे २० फ्रँक होत.

भुर्दंड व निर्गत मालाला फायदाच होय. ह्यामुळें असा परिणाम होत असतो कीं, आयात माल कमी कमी येऊं लागतो व निर्गत माल जास्त जाऊं लागतो व अशा तऱ्हेनें आयात व निर्गत मालांच्या एकंदर किंमतीमधील फरक कमी कमी होत जातो.

६० **'गोल्ड पॉइन्टस्'**:— पण हुंडणावळीच्या भावाच्या चढउतारीला कांहीं मर्यादा आहे. हुंड्या विकत घेणें किंवा विकणें हा जो उद्योग व्यापारी लोक दलालाचेमार्फत करीत असतात त्यांत त्यांचा प्रधान हेतू असा असतो कीं, पोष्टानें पैसे पाठवून जो खर्च यावयाचा त्यापेक्षां ह्या तऱ्हेनें कमी खर्च होऊन थोडा फायदा पडावा. पण हाच दर जर सारखा वाढत चालला व जास्त पैसे पडूं लागले तर हुंड्या विकत घेण्यापेक्षां प्रत्यक्ष सोनेंच पाठविणें जास्त हितकर होईल; व लोक हुंड्या न विकत घेतां प्रत्यक्ष सोनें पाठवूं लागतील. तेव्हां हुंडणावळीचा दर वाढणें व उतरणें ह्याची मर्यादा एका देशांतून दुसऱ्या देशांत पाठविल्या जाणाऱ्या सोन्याबद्दल जो खर्च येतो त्यावर अवलंबून राहील. ह्याच मर्यादांना इंग्लिशमध्यें 'गोल्ड पॉइंटस्' अशी संज्ञा आहे. ह्या मर्यादेला ज्या वेळीं एखाद्या देशांत हुंडणावळीचा भाव येऊन पोंचतो व त्यामुळें त्या देशांतून सोनें बाहेर जाऊं लागतें त्या वेळीं त्या देशाला हुंडणावळीचा दर तोट्याचा असतो अशी म्हणण्याची चाल आहे. आतां असा प्रतिकूल दर असणें म्हणजे त्या देशाला खरोखरच नुकसानीची बाब आहे अशांतला भाग नाहीं. पण अर्थशास्त्रामध्यें अशी परिभाषा ठरून गेली आहे एवढेंच.

(६१) **हिंदुस्थानांत हुंडणावळीच्या प्रश्नाला आलेलें महत्त्वः**—आतांपर्यंत जें विवेचन करण्यांत आलेलें आहे, तें जर बरोबर समजलें असेल, तर हिंदुस्थानांत जी व्यापाराची उलाढाल होत असते व हुंडणावळीचा जो दर ठरत असतो, त्याबद्दल कोणालाही यथार्थ कल्पना करतां येईल. ह्या देशांत हुंडणावळीच्या प्रश्नाला फारच महत्व आलेलें आहे. कारण सरकारचें चलनी नाण्याविषयींचें धोरण ह्या प्रश्नावरच अवलंबून आहे. ह्याला अनेक कारणें आहेत. हिंदुस्थानांत अंतर्गत व्यापाराचाच विचार केला

असतां वस्तूंची किंमत रुपयांत घेण्यांत येत असते व १८९३ सालाच्या अगो-दर तर ह्या देशांत रुपया हेंच मुख्य नाणें होतें. इतर देशांतून चांदीची हकाल-पट्टी झाल्यामुळें ह्या देशांत चांदीचा भाव उतरूं लागला व हिंदुस्थानला जेव्हां सोन्याचें नाणें प्रचलित असलेल्या देशांतील व्यापाऱ्यांना पैसे द्यावे लागत, त्या वेळीं चांदीचा भाव उतरला असल्यामुळें रुपये जास्त जास्त द्यावे लागले व येथें माल महाग होऊं लागला. विशेषतः बाहेरून येणाऱ्या मालाबद्दल येथील व्यापाऱ्यांना जास्त पैसे द्यावे लागत व निर्गत मालाच्या व्यापाऱ्यांना त्यांच्या मालाबद्दल सोन्याच्या नाण्यांत जी किंमत येई तीच किंमत सोन्याच्या नाण्यांचे मोबदला रुपये घ्यावयाचे वेळीं ते रुपये जास्त मिळाल्यामुळें जास्त येई व त्यांचा फायदा होई. शेवटीं १८९३ सालीं लोकांना टांकसाळी बंद झाल्या-वर व वस्तूंची किंमत सोन्याच्या नाण्यांत घेण्याचें ठरल्यावर हा हुंडणावळीचा भाव १ रुपयास १६ पेन्स असा स्थिर होऊं लागला.

ह्या हुंडणावळीच्या प्रश्नाला महत्व येण्याचें दुसरें असें एक कारण आहे कीं, हिंदुस्थान सरकाराला दर वर्षी विलायतेस 'होमचार्जेस' निमित्त ३१ कोट रुपये पाठवावे लागतात. पण विलायतेस हे रुपये चालत नसल्यामुळें साव्ह-रिन घेऊन तेथें भरणा करावा लागतो. तेव्हां हुंडणावळीचा दर जर कायम राहिला नाहीं तर स्टेट सेक्रेटरीला पाठविण्याकरितां बजेटमध्यें किती रकम मंजूर करावयाची हें निश्चित करणें कठीण जातें; म्हणून हा हुंडणावळीचा भाव स्थिर असणें हिंदुस्थान सरकारास सर्वथैव श्रेयस्कर आहे. ह्या ठिकाणीं दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, इतर देशांप्रमाणें येथें हुंडणावळीचा भाव बाजारांत असलेल्या सोन्याचांदीच्या किंमतीवर किंवा आयातनिर्गत मालावरच सर्वस्वीं विसंबून रहात नाहीं; तर कधीं कधीं स्टेट सेक्रेटरी किंवा हिंदुस्थान सर-कार एकमेकांवर काढलेल्या हुंड्या विकण्याचें सुरू ठेवतात किंवा बंद ठेवतात व त्या-मुळेंहि ह्या हुंडणावळीच्या भावांत चलबिचल होत असते. विलायतेमध्यें स्टेट सेक्रेटरी स्वतःला लागणाऱ्या खर्चाची भरपाई करण्याकरितांच केवळ हुंड्या विकावयाला काढीत नाहीं, तर व्यापाराचे सोयीकरतां वाजवीहून जास्त हुंड्या विकावयाला

काढून जें सोनें मिळेल त्यावर चांदी खरेदी करून तिचे रुपये पाडण्याकरितां तो ती चांदी हिंदुस्थानांत पाठवून देतो. हिंदुस्तानचा निर्गत माल आयात मालापेक्षां नेहमीं जास्त असतो, त्यामुळें येथील व्यापाऱ्यांना विलायतच्या व्यापाऱ्यांकडून नेहमीं पैसे घ्यावयाचे असतात; तेव्हां विलायतच्या व्यापाऱ्यांना थोडया खर्चांत हिंदुस्थानांत रक्कम देतां यावी म्हणून स्टेट सेक्रेटरी वाजवीहून फाजील हुंडया विकावयाला काढीत असतो. ज्या वेळीं व्यापार तेजीमध्यें असतो त्या वेळीं विलायतच्या व्यापाऱ्यांना इकडे जास्त रक्कम पाठवावयाची असते व ह्या वेळीं स्टेट सेक्रेटरीने विकावयास काढिलेल्या हुंडया विकत घेण्याची विलायतच्या व्यापाऱ्यांमध्यें अहमहमिका चालू असते. अशा वेळीं अर्थात्च हुंडणावळीचा भाव चढत असतो व ज्या वेळीं व्यापार मंदावला असतांना निर्गत माल फारच कमी असतो, त्या वेळीं विलायतेचे व्यापारी ह्या हुंडया घेण्यास फारसे उत्सुक नसतात; त्यामुळें अर्थातच हुंडणावळीचा दर उतरतो. जोंपर्यंत टांकसाळी लोकांकरतां खुल्या होत्या, तोंपर्यंत हिंदुस्थानांत चांदी वाटेल तेवढी येत असे व स्टेट सेक्रेटरीला हुंडणावळीचा दर फारसा वाढवितां येत नसे; पण आतां टांकसाळी बंद झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारच्या हातांत रुपये पाडण्याचे बाबतींत पूर्ण सत्ता आलेली आहे व त्याचा असा परिणाम झाला आहे कीं, विलायतेच्या व्यापाऱ्यांनीं एक तर स्टेट सेक्रेटरीनें विकावयास काढलेल्या हुंडया विकत घ्याव्यात किंवा सॉव्हरिन पाठवावे. कधीं कधीं हिंदुस्थान सरकार स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंडया काढीत असते. ज्या वेळीं निर्गत माल कमी होतो व आयात माल जास्त असतो, किंवा येथील व्यापारी व गोरे अधिकारी ह्यांना आपले पैसे विलायतेंत पाठवावयाचे असतात, त्या वेळीं त्यांचे सोयीकरतां हिंदुस्तान सरकारास ह्या हुंडया स्टेट सेक्रेटरीवर काढाव्या लागतात.

**( ६२ ) स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांचा पूर्वेतिहासः**—हिंदुस्थाननें विलायतेमध्यें पाठवावयाचे पैसे थोडया खर्चांत कसे पाठवावे, हा प्रश्न १९ व्या शतकाच्या प्रारंभापासून सरकारसमोर आहे. १८१३ सालापासून कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ह्या प्रश्नाचा विचार करीत होते. डायरेक्टरनीं येथील सर-

कारास असें कळविलें कीं, "तुह्मा सरकारी नोकरांस अगाऊ रकम द्यावी व त्या रकमेची फेड विलायत सरकारकडून विलायतेंत व्हावी, किंवा तुह्मीं खाजगी व्यापाऱ्यांकडे रकमेचा भरणा करून द्यावा. म्हणजे एक तर तुमच्यावर ज्या हुंडया दिलेल्या असतील त्यांचे मोबदला हे व्यापारी विलायतेंत पैसे भरतील किंवा विलायतेस विक्रीसाठीं पाठविल्या जाणाऱ्या मालाची खरेदी हिंदुस्थानांत करण्याकरितां जो पैसा लागेल तो हे व्यापारी तुमच्याकडून अगाऊ घेतील असें आह्मी समजूं. इतकेंही करून सर्व रकम तुमच्याकडून पाठविली गेली नाहीं व कांहीं बाकी शिल्लक राहिली तर तुह्मी सोन्यारुप्याच्या लगडी पाठवाव्या." प्रसंगानुसार ह्या सर्व उपायांचा अवलंब सरकारनें केलेला आहे व कलकत्यांत हुंडया विकत घेऊन विलायतेला पैसे पाठविले आहेत. पण ह्या सर्व उपायांपेक्षां स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारावर हुंडया काढण्याची पद्धतच श्रेष्ठ ठरलेली आहे; व तीच पद्धत १८६२ सालापासून प्रचारांत आहे. प्रथम प्रथम ह्या हुंडया महिन्यानें एकदां ठराविक भावानें विकावयाला काढल्या जात. पुढें पुढें ह्या हुंडया आठवडयानें विकावयास काढण्याची पद्धत सुरू झाली व पूर्वीचा ठराविक भाव जाऊन लिलांवाची पद्धत सुरू होऊन जो कोणी सर्वांत जास्त रकम देईल त्यालाच ह्या हुंडया मिळूं लागल्या. पुढें पुढें तर ठराविक ८ दिवसांच्या मुदतीच्या आंतच वाटेल त्या दिवशीं हुंडया विकावयास काढण्याचा प्रचार सुरू झाला व अशा विकल्या जाणाऱ्या हुंडयांना ' इंटरमिजिएट ' किंवा ' स्पेशल ' अशीं नांवें मिळूं लागलीं.

**(६३) स्टेट सेक्रेटरीची सध्यांची हुंड्या विकण्याची पद्धतः**—महायुद्धाला प्रारंभ झाल्यापासून वर सांगितलेल्या पद्धतींत थोडे-बहुत फेरफार झालेले आहेत. हुंडणावळीचा भाव कह्यांत ठेवण्याकरितां स्टेट सेक्रेटरीला ' एक्सचेंज बँकांच्या मदतीनें हुंडया विकण्याचे दर ठरवावे लागले; इतकेंच नव्हे तर कांहीं विशिष्ट व्यक्ती किंवा कंपन्या ह्यांना हुंडया विकण्याचें त्यानें ठरविलें. त्याचप्रमाणें त्या कंपन्यांनीं असुक रकमेपर्यंतच हुंडया विकत घ्यावा, असा त्यानें त्यांच्याशीं ठराव केला. तसेंच 'डिफर्ड ह्मणजे ज्या हुंडयाबद्दल

पैसे १६ दिवसांनींच मिळावयाचे अशा नवीनच हुंड्या विकण्याची पद्धत स्टेट सेक्रेटरीनें सुरू केली. हल्लीं फक्त 'टेलिग्रॅफिक ट्रॅन्सफर व डिफर्ड' ह्या दोन तऱ्हेच्या हुंडया विकण्यांत येतात.

विलायतेमध्यें स्टेट सेक्रेटरी जेव्हां हुंड्या विकतो तेव्हां त्याच्या विक्रीचे पैसे सामान्यपणें तो आपल्या खजिन्यांत ठेवतो. जरूरीच्या वेळीं पेपर करन्सी रिझर्व्ह किंवा 'गोल्ड स्टॅंडर्ड रिझर्व्ह' ह्यांच्या विलायतेमधील शाखेंत तो ही रकम ठेवित असतो. हिंदुस्थानांत ज्या वेळीं पैसे द्यावयाचे असतात त्या वेळीं हे पैसे सरकारी खजिन्यांतून किंवा वर सांगितलेल्या रिझर्व्हच्या हिंदुस्तानच्या शाखेंतून देण्यांत येतात. ह्या हुंड्याच्या विक्रीचा इतिहास १८९३ सालापसून जर आपण बघितला तर तो फरक मनोरंजक आहे. प्रथम प्रथम १८९३ सालापर्यंत निवळ 'होमचार्जेस'चा खर्च भागविण्याकरितांच विलायतेमध्यें हुंड्या विकल्या जात. १८९३ सालानंतर कांहीं वेळ रुपयाच्या हुंडणावळीचा भाव चढविण्याकरितां हुंड्याची विक्री बंद ठेवण्यांत आली. १८९८ सालीं 'गोल्ड-नोट' नांवाच्या कायद्यान्वयें विलायतेमधील 'पेपरकरन्सी'च्या शाखेंतल्या बँक ऑफ इंग्लंडमध्यें ठेवलेल्या सोन्याच्या आधारावर स्टेट सेक्रेटरी हुंड्या विकी. हिंदुस्तानांत त्या हुंड्या घेऊन व्यापारी आले असतां हिंदुस्तान सरकार वर सांगितलेल्या पेपरकरन्सी रिझर्व्हमध्यें असलेल्या सोन्याच्या आश्रयावर नोटा देऊन त्यांना पैसे चुकते करी. अशा हुंड्या विकण्याचा स्टेट सेक्रेटरीचा उद्देश निव्वळ स्वतःला लागणारे पैसे मिळावे एवढाच नव्हता, तर अशा हुंड्या विकावयास न काढल्यामुळें जे साव्हरिन विलायतेच्या व्यापाऱ्यांनीं हिंदुस्तानांत पाठविले असते व हिंदुस्तानांत विनाकारण सोनें साचलें असतें तें न सांचावें व नोटांचा प्रसार जास्त प्रमाणांत व्हावा हाही त्याचा हेतु होता.* लढाईचे पूर्वी

* वाचकांनीं ही गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवावी. सरकारचें प्रथमपासून धोरण असें आहे कीं, होतां होईल तों हिंदुस्थानांत लोकांच्या गरजा रुपयांनीं भागवून येथील सोनें शक्य तितक्या रीतीनें विलायतेमध्यें न्यावयाचें. हें धोरण हिंदुस्थानास सर्वथैव अनिष्ट आहे हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेल.

स्टेट सेक्रेटरी १ रुपयास १६$\frac{7}{8}$ पेन्स ह्या दरानें हुंड्या विकावयास काढीत असे. १९०७-८ सालीं चिंताजनक परिस्थिति उलटून गेल्यावर १९०९ सालीं लंडन शहरांतील 'गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्हमधील कमी झालेलें सोनें पुनः भरून काढण्याकरितां स्टेट सेक्रेटरीनें हुंड्या विकल्या. हेतु असा कीं, पुनः जर हुंडणावळीचा भाव उतरला तर पुनः तो स्थिर करण्यास ह्या सोन्याचा उपयोग व्हावा.

६४ **चेंबरलेन कमिशनच्या सूचनाः**—चेंबरलेन कमिशननें हुंड्या विकण्याच्या बाबीसंबंधानें अशी टीका केली होती कीं, ज्या वेळीं वस्तुतः स्टेट सेक्रेटरीला सोन्याची जरूर नसते त्यावेळींसुद्धां तो विनाकारण स्वस्त दरानें हुंड्या विकतो; तरीपण मागें सांगितलेल्या सुवर्ण मर्यादेंच्या आंत (गोल्ड पाइन्ट) जर तो ह्या हुंड्या विकीत असेल तर अमक्याच किंमतीच्या किंवा अमक्याच दरानें स्टेट सेक्रेटरीनें हुंड्या विकाव्यात असे निर्बंध आपण घालूं इच्छित नाहीं. कमिशनचें मत सरकारनें एका ठराविकच दरानें नेहमीं हुंड्या विकण्याच्या विरुद्ध होतें. त्याचें कारण कमिशननें असें सांगितलें कीं, असा एक दर ठरवून टकला तर स्टेट सेक्रेटरीला हुंडणावळीच्या बजारांत एक प्रकारचा मक्ताच मिळाल्यासारखें होईल; शिवाय बाराही महिने सरकारला ठराविक दरानें हुंड्या विकणें परवडेल किंवा नाहीं हा एक प्रश्नच आहे. असा एकच दर ठरविल्यानें हुंड्या विकण्याच्या बाबतींत अनिश्चितपणा येऊं लागेल व त्यामुळें हिंदुस्तानांत खजिन्यांत जास्त शिल्लक ठेवावी लागेल.

कधींकधीं कांहीं लोक अशीही सूचना करितात कीं, स्टेट सेक्रेटरीनें ठराविक दरापेक्षां कमी दरानें कधींही हुंड्या विकूं नयेत; पण कमिशननें असें मत दिलें कीं, ही सूचना मान्य केली तर असा फायदा होईल कीं, हुंडणावळीच्या दराचें कमीजास्त होण्याचें मान बरेच कमी होईल; एकंदरीत ही सूचना बरी आहे. कारण हल्लीं स्टेट सेक्रेटरी कमीजास्त दरानें हुंडया विकीत असल्यामुळें ह्या दरांत फरक बराच पडत असतो; एवढेंच नव्हे तर त्यामुळें हिंदुस्थान व इतर देश ह्यांमध्यें भांडवल हवें तसें खेळत नाहीं. तरीपण हुंडणावळीचा दर हा अमकाच असावा असें कायद्यानें ठरविणें इष्ट नाहीं. हुंडणावळीचा दर कमीजास्त होणें हें हिंदुस्थानांत पैसे पाठविण्यास व ते

इन्स्यूअर करण्यास लागणाऱ्या खर्चावर अवलंबून असतें. तेव्हां आमची एकंदरीत अशी सूचना आहे कीं, सरकारनें बाजार भावानेंच हुंड्या विकावयास काढाव्यात व जर ह्यांत तोटा होत असेल तर रोख पैसे पाठवावेत.

**(६५) १९१६ सालचा हुंडणावळीचा दर:**— १९१६ सालीं हुंडणावळीचा भाव वाढण्यापूर्वी ह्या हुंड्यांचा दर रुपयास $१५\frac{२९}{३२}$ पेन्स होता. व तारेनें ज्या हुंड्याबद्दल पैसे मिळावयाचे त्या हुंड्यांचा दर $१५\frac{१५}{१६}$ पेन्स होता. हिंदुस्थानांतल्या बँकांचा दर जोंपर्यंत शेंकडा आठ ह्याप्रमाणें वाढत नसे तोंपर्यंत ह्याच हुंड्या अमर्याद प्रमाणांत $१६\frac{१}{८}$ पेन्स व टेलिग्रॅफिक ट्रॅन्सफर $१६\frac{५}{३२}$ पेन्स ह्या दरानें विकल्या जात; व बँकांचा दर जेव्हां शेंकडा ८ हून जास्त वाढे तेव्हां रुपयास $१६\frac{३}{१६}$ ह्या दरानें त्या हुंड्या विकल्या जात असत. १९१६ सालच्या अखेरीससुद्धां आठवड्यास ८० लाखपर्यंत हुंड्या मर्यादित करण्याचें स्टेट सेक्रेटरीनें ठरविलें; तरी टेलिग्रॅफिक ट्रॅन्सफरचा भाव $१६\frac{१७}{३२}$ पेन्स व 'डिफर्ड'चा व हुंड्यांचा भाव $१६\frac{१}{८}$ पेन्स हाच त्यानें ठरविला.

**(६६) आयात निर्गत मालांचा एकंदर किंमतींतील अनुकूल प्रतिकूल फरक:**—वर एकदां असा उल्लेख करण्यांत आला आहे कीं, एखाद्या देशांत आयात मालापेक्षां निर्गत माल जर जास्त असेल, तर तेथें व्यापाराची स्थिति समाधानकारक मानण्यांत येते. पण जर आयात माल निर्गत मालापेक्षां जास्त असेल, तर तेथें अर्थात व्यापाराची स्थिति समाधानकारक नाहीं असें मानण्यांत येतें. हे नियम सामान्यपणें बरोबर आहेत. पण ते सर्वत्र लागू पडत नाहींत. उदाहरणार्थ, इंग्लंडचाच व्यापार घ्या. ह्या देशांत आयात माल नेहमीं निर्गत मालापेक्षां जास्त असतो, तरी पण तेथें व्यापाराची स्थिति समाधानकारक नाहीं असें कोणी समजत नाहीं; कारण हा जास्त आयात माल म्हणजे इंग्लंडनें जी इतर राष्ट्रांस आर्थिक मदत दिलेली असते तिचा मोबदला होय, अशी वस्तुस्थिति आहे. उलट आपण हिंदुस्थानचें उदाहरण घेऊं. ह्या देशाचा निर्गत माल जरी जास्त असला तरी सर्वच जास्त निर्गत मालाबद्दल ह्या देशाला परदेशच्या व्यापाऱ्यांकडून पैसे मिळतात असें थोडेंच

आहे. हिंदुस्थानला दरवर्षी ३२ कोटि रुपये स्टेट सेक्रेटरीकडे पाठवावे लागतात व शिवाय येथील वरिष्ठ खात्यांतले युरोपियन अंमलदार लोक आपल्या मुलांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ व इतर कांहीं कारणानें विलायतेस पैसा पाठवीत असतात. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतले गोरे व्यापारी लोक आपलें भांडवल येथें गुंतवून जो नफा मिळवितात, त्या नफ्याचे पैसे ते ह्या देशांत न ठेवतां विलायतेमध्यें पाठवितात. ह्या देशांत सुमारें ७५० कोट रुपयांचें भांडवल विलायती व्यापाऱ्यांनीं गुंतविलें असून त्या भांडवलावर त्यांना ४० कोट रुपये नफा अदमासें मिळत असतो. हे सर्व ७२ कोट रुपये कच्च्या निर्गत मालाचे रूपानें हिंदुस्थानांतून जात असतात. ज्या वेळीं निर्गत मालाबद्दल देशांत पैसे येत असतात, त्या वेळीं जर आयात मालापेक्षां निर्गत माल जास्त येत असेल, तर त्या देशाला फायदा होईल. येथें पहावें तों ह्या ७२ कोटींबद्दल मोबदला लोकांना कांहीं मिळत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे दरवर्षी ह्या गरीब देशांतून एवढी मोठी रक्कम जाणें म्हणजे देशाच्या सांपत्तिक स्थितीला मोठें संकटच आहे. हा पैसा बाहेर पाठविणें म्हणजे हा खरोखरच मोठा द्रव्यशोष आहे असें जर कोणीं म्हटलें तर सरकारपक्षीय लोकांना तें म्हणणें पटत नाहीं. ते म्हणतात कीं, ५ हजार कोसांवरून थंड देशांतून येथील उष्ण देशांत येऊन रहावयाचें व येथील लोकांचें रक्षण करावयाचें, त्यांना शहाणे करावयाचें व स्वतःचें भांडवल आणून त्यांना व्यापाराचे दृष्टीनें लहानाचे मोठे करावयाचें, ह्याबद्दल हे ७२ कोट रुपये हिंदुस्थानला द्यावे लागणें, म्हणजे हा कांहीं फार नुकसानीचा भाग आहे असें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थान जर ब्रिटिश साम्राज्याचा भाग आहे व त्यास जर शांतता, सुराज्यपद्धति, पाश्चिमात्य संस्कृति वगैरे गोष्टींचा फायदा मिळतो, तर त्याबद्दल एवढी रक्कम द्यावी लागली तर लोकांनीं कां म्हणून कुरकुरावें? ही विचारसरणी किती भ्रामक आहे, हें निराळें सांगणें नको.

**( ६७ ) हिंदुस्थान सरकारच्या खजीन्यांतील शिलकीची व्यवस्थाः**—येथें हें सांगणें अवश्य आहे कीं, हिंदुस्तानचें उत्पन्न, त्याची शिल्लक ( हिंदुस्तान व इंग्लंड ह्यांच्या खजिन्यांत ठेवलेली ) वगैरे सर्व राष्ट्रीय

फंडच समजला जातो व ह्या फंडाचे दोन अलग हिशोब ठेवलेले असतात. एका भागांत सरकारच्या वार्षिक वसुलाचा व खर्चाचा हिशोब असतो; व दुसऱ्यांत रेल्वेसारख्या संस्थांना दिलेल्या भांडवलाचा हिशेब असतो. वर्षारंभीं स्टेट सेक्रेटरी व हिंदुस्तानसरकार ह्यांचे जवळ विलायतेंत ६ कोटी व हिंदुस्तानांत १८ कोटींची शिल्लक असावी असें ठरलेलें आहे. सरकारला कोठल्याही मार्गानें वसूल येवो, तो ह्या शिलकींत ठेवण्यांत येतो व खर्चही ह्या शिलकींतून होत असतो. वर्षाच्या आरंभीं शिलकेची काय स्थिति आहे, सार्वजनिक इमारती, रस्ते, वगैरे बांधण्याच्या खात्याला पैसे पुरविण्याकरितां किंवा थोडयामुदतीच्या व कायमच्या कर्जाची फेड करण्याकरितां किती रक्कम हिंदुस्तानांत व विलायतेंत कर्ज म्हणून काढली पाहिजे, त्याचप्रमाणें हुंड्या विकून स्टेट सेक्रेटरीला किती पैसा उत्पन्न करितां येईल वगैरे बाबींचें एक अंदाजपत्रक तयार करण्यांत येतें. पण किती झालें तरी तें अंदाजपत्रक; वर्षाअखेर, वर्षारंभीं मंजूर केलेल्या खर्चाच्या रकमेंत व प्रत्यक्ष खर्च केलेल्या रकमेंत, विलक्षण अंतर पडलेलें दिसून येतें. स्टेट सेक्रेटरी ज्या हुंड्या विकावयास काढितो त्या हुंड्याची संख्या हिंदुस्तानच्या व्यापाराच्या परिस्थितीवर अवलंबून असते. विलायतेच्या व्यापाऱ्यांना ज्यावेळीं हिंदुस्तानांत पैसे पाठवावयाचे असतात त्यावेळीं ह्या हुंड्याची मागणी सुरु होते; अशा वेळीं अर्थातच हुंडणावळीचा भाव स्टेट सेक्रेटरीला फायदेशीर असतो. पण ह्या हुंडयांना जोराची मागणी यावयाची म्हणजे विलायती व्यापाऱ्यांनीं हिंदुस्तानांतून बराच माल मागविला पाहिजे व हा माल जास्त प्रमाणांत मागवावयाचा म्हणजे ह्या देशांत पाऊसपाणी मुबलक व योग्य वेळीं पडून पिकें चांगलीं आलीं पाहिजेत. पण यंदा पाऊस चांगला होईल हें कोणासच अगाऊ सांगतां येत नाहीं; तेव्हां हुंडयांना भाव चांगला येईल हें स्टेट सेक्रेटरीला निश्चयानें ठरवितां येत नाहीं; म्हणून वर्षभर त्याला लोकांना पैसे द्यावयाचे असतात, ह्या करणास्तव तो व्यापाराच्या तेजीच्या व मंदीच्या वेळीं हुंड्या विकावयाला काढीत असतो. रुपयाची सोन्यांतली किंमत १६ पेन्स ही कायद्यानें ठरली असल्यानें व स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांना नेहमीं मागणी असल्यानें त्याला स्वतः ठरवील त्या दरानें हुंड्या विकतां येतात. हुंड्या

बिकल्यावर जो पैसा स्टेट सेक्रेटरीस मिळतो त्याचा विनियोग, नित्याचा खर्च करणें किंवा ज्यावेळीं हिंदुस्तानांतील 'पेपर करन्सी' व 'गोल्ड स्टँडर्ड' ह्या दोन्ही रिझर्व्हमधून स्टेट सेक्रेटरीनें विकलेल्या हुंड्या पटविल्या जातात त्यावेळीं विलायतेमधील ह्या रिझर्व्हमध्यें, जितक्या रकमेच्या हुंड्या हिंदुस्थानांत पटविल्या असतील तितक्या किंमतीच्या रकमेची भरती करणें, किंवा कायमच्या व तात्पुरत्या कर्जाची फेड करणें वगैरे गोष्टींकडे करण्यांत येतो.

---

# भाग दहावा.

—:-×०×-:—

## युद्धकालीन परिस्थिति.



**( ६८ ) सुवर्णविनिमयपरिमाणपद्धति व तिला असलेले धोके:**—पूर्वी एकदां सांगण्यांत आलेंच आहे कीं, हिंदुस्थानांत आंतर्व्यवहारांत रुपयांचा उपयोग करण्यांत येतो व परराष्ट्रांना पैसा देतांना तो सोन्याच्या रूपानें दिला जातो. तसेंच हिंदुस्थानांत रुपयाचें नाणें कृत्रिम आहे. अशी परिस्थिति असल्यानें सरकारला कृत्रिम तऱ्हेनें ठरविलेला १ रुपयाला १६ पेन्स हा भाव कायम ठेवण्याकरितां जिवापाड खटपट करावी लागते. वास्तविक पाहिलें असतां दोन देशांमध्यें पैशाची अदलाबदल करतांना हुंडणावळीचा भाव व्यापारी परिस्थितीनेंच ठरला पाहिजे. तो निश्चित करण्यांत सरकारनें मध्यें पडतां कामा नये व ज्या देशांत सोन्याचें नाणें आहे त्या देशांत परस्पर पैशाची अदलाबदल होत असतांना सरकारला हात घालण्याची जरूरी पडत नाहीं. पण हिंदुस्तानांत होतांहोईल तों सोनें राहूं नये अशी सरकारची इच्छा असल्यामुळें येथें गोल्ड स्टँडर्ड सुरू करण्यांत येत नाहीं; व त्याचा असा परिणाम झाला

आहे कीं, सरकारला प्रसंग पडेल त्याप्रमाणें रुपयांचा व सोन्याचा पुरवठा करणें भाग पडतें व कधीं स्टेट सेक्रेटरीला तर कधीं हिंदुस्तान सरकारला हुंड्या विकाव्या लागतात. ज्या वेळीं हिंदुस्थानांतून माल बाहेर जात असतो व तो आयात मालापेक्षां जास्त असतो तेव्हां सर्व कांहीं सुरळित चालतें; पण ज्यावेळीं निर्गत मालापेक्षां आयात माल जास्त येतो व व्यापारमंदीमुळें किंवा सांपत्तिक अडचणीमुळें किंवा चांदीचा भाव वाढल्यामुळें सरकारला रुपयाची कृत्रिम किंमत कायम ठेवणें कठिण जाऊं लागतें त्यावेळीं ह्या गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डचा बोजवारा उडून जातो व लोकांचें अतोनात नुकसान होतें. ह्या धेडगुजरी स्टँडर्डला दोन्हीकडून भीति असते. आयात मालापेक्षां निर्गत माल जास्त झाला म्हणजे विलायतेच्या व्यापाऱ्यांना हिंदुस्थानांत पैसे पाठवावे लागतात; व होतांहोईल तों सोनें पाठवावयाचें नाहीं व हिंदुस्तानांतील व्यापाऱ्यांना रुपये द्यावयाचे असें धोरण निश्चित असल्यामुळें रुपयांची मागणी जोरानें सुरू होते; तितके रुपये शिल्लक नसल्यामुळें हुंडणावळीचा भाव वाढूं लागतो व कधीं कधीं सरकारला हुंड्याच कमी विकणें भाग पडतें. बरें, निर्गत मालापेक्षां आयात माल जास्त झाला तर येथील बाहेरून माल आणणाऱ्या व्यापाऱ्यांना पुरेशा हुंड्या मिळत नाहींत; म्हणून त्यांना सोनें विकत घेऊन तें विलायतेच्या व्यापाऱ्यांना पाठवावें लागतें व तें तर दुर्मिळ होतें; म्हणजे १ रुपयास १६ पेन्स देणें न परवडल्यामुळें हुंडणावळीचा भाव उतरूं लागतो. तेव्हां दोन्ही दृष्टीनें ह्या प्रचलित 'गोल्ड एक्सचेंज स्टँडर्डला' धोकाच आहे.

**(६९) युद्धामुळें झालेली चांदीच्या किंमतीची भयंकर वाढः**—ह्या 'गोल्ड एक्सचेंज स्टँडर्ड'चे जे पुरस्कर्ते आहेत त्यांची अशी एक ठाम समजूत होती कीं, एका रुपयांत असलेल्या चांदीची किंमत कधींही वाढणार नाहीं. निदान सरकारनें ठरविलेल्या १६ आण्यांच्या किंमतीहून जास्त तर ती कधींही होणार नाहीं; कारण जगांत चांदीला महत्त्व फक्त चीन व हिंदुस्थान ह्या दोन देशांतच आहे. पण महायुद्धामुळें जे चमत्कार घडून आले त्यांपैकीं चांदीच्या किंमतीची वाढ हा एक चमत्कार आहे. ही चांदीची किंमत

वाढण्याचीं अनेक कारणें होतीं. ह्या कारणांचा विचार मागें केल्यामुळें त्यांची द्विरुक्ति आम्ही येथें करीत नाहीं. चांदीची किंमत वाढतां वाढतां १९१९ च्या आक्टोबर महिन्यांत एका औंसाला ६६½ पेन्स पडूं लागले व १९२० च्या फेब्रुवारींत ही किंमत ८९ पेन्सपर्यंत गेली. लढाईचे पूर्वी ह्याच चांदीचा भाव ५४ पेन्स होता. तेव्हां अर्थात् रुपये व्यवहारांत वापरण्यापेक्षां ते आटवून त्यांत मिळणारी चांदी विकणें फायदेशीर होऊं लागलें; रुपये दुर्मिळ होऊं लागले व एक रुपया व अडीच रुपये किंमतीच्या नोटांचा सुकाळ झाला. १९१५ सालीं एकंदर नोटा ६०·२६ कोटि रुपयांच्या होत्या, तर १९१९ सालीं सप्टेंबर महिन्यांत १०८ कोटींपर्यंत ही नोटांची वाढ झाली. असो. सांगावयाचें तात्पर्य असें कीं, चांदीची किंमत खूप वाढल्यामुळें रुपया हें कृत्रिम नाणें असें न समजतां अस्सल नाण्याहून त्याची योग्यता जास्त आहे असें अनुभवास येऊं लागलें; व नवीन रुपये पहिल्याच दरानें पाडणें म्हणजे आंतबट्ट्याचा व्यवहार आहे अशी सरकारची खात्री झाली.

(७०) **गंगाजळी ठेव व हुंडणावळीचा दरः**—आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, हुंडणावळीच्या भावांत जर चलबिचल होऊं लागली तर तो विलायतेमधील गंगाजळी ठेवीच्या साहाय्यानें स्थिर ठेवणें हें स्टेट सेक्रेटरीचें काम नाहीं काय? रुपया हें कृत्रिम नाणें करून त्या रुपयापासून होणाऱ्या नफ्यापासूनच जर ह्या गंगाजळी ठेवीचा उगम आहे तर ह्या रुपयामधील चांदीचा भाव वाढल्यामुळें पूर्वींचा १६ पेन्स भाव कायम रहात नसेल तर ह्या गंगाजळींतून सोनें काढून पूर्वींचा भाव सरकारनें कायम ठेविला पाहिजे. ह्यावर सरकार पक्षीय लोकांचें असें म्हणणें आहे कीं, हा सुवर्णनिधि निर्माण करण्याचा हेतू एवढाच आहे कीं, ज्या वेळीं निर्गत मालापेक्षां आयात माल देशांत जास्त होता व त्यामुळें हुंडणावळीचा भाव उतरूं लागतो, त्यावेळीं स्टेट सेक्रेटरीला आपल्या हुंड्या विकण्याचें काम कांहीं वेळ बंद ठेवतां येऊन खजिन्यांत जी तूट येईल ती ह्या गंगाजळींतून भरून काढतां यावी; तसेंच हिंदुस्थान सरकारला हा हुंडणावळीचा भाव कायम ठेवण्याकरितां स्टेट सेक्रेटरीवर

उलट हुंड्या विकतां याव्यात व स्टेट सेक्रेटरीनें ह्या हुंड्या घेऊन येणारांस ह्या निधींतून सोनें द्यावें म्हणून ही गंगाजळी निर्माण करण्यांत आली आहे. तात्पर्य, गंगाजळी हुंडणावळीचा भाव उतरला असतां तो पूर्वपदावर आणण्यास्तव आहे. हुंडणावळीचा भाव चढला असतां तो खालीं उतरविण्याकरितां नाहीं. कारण चांदीचा भाव कधीं काळीं चढेल हें कोणाच्या स्वप्नींही नव्हतें व तो १९१७ सालीं जसा चढला तसा चढणें ही तर अशक्य कोटींतली गोष्ट होय, असेंच ही गंगाजळी ठेव निर्माण करतांना प्रत्येकास वाटत होतें.

वास्तविक पाहिलें असतां ह्या सरकारच्या म्हणण्यांत फारसा अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाहीं. एक रुपयाचा १६ पेन्स असलेला दर १७ पेन्स करणें किंवा २४ पेन्स करणें ह्यापासून काय नुकसान आहे ह्याचें पुढें विवेचन येणार आहे; त्यामुळें सध्यां ह्या मुद्यावर आम्ही फारसें लिहूं इच्छित नाहीं. पण एवढेंच येथें सांगणें इष्ट आहे कीं, एखादी गोष्ट एका वेळीं विवक्षित कारणाकरितां निर्माण करण्यांत आली असली तरी प्रसंग पडल्यास ती अन्य कारणाकरितां उपयोगांत आणूंच नये असें थोडेंच आहे. गंगाजळी ठेव प्रथम हुंडणावळीचा भाव उतरला असतां पुनः स्थिर करण्याकरितां निर्माण झाली असेल; पण १९१७ सालसारखा प्रसंग आला असतांना ह्या गंगाजळीचा उपयोग करण्यांत आला असता तर येथील व्यापाऱ्यांचें नुकसान झालें नसतें.

**(७९) बॅबिंगटनस्मिथ कमेटीच्या सूचनाः—**हिंदुस्थान सरकार, जसजशी चांदीची किंमत वाढूं लागली तसतसा हुंडणावळीचा दरही वाढवूं लागलें. आतां प्रश्न असा आला कीं, हा दर कितीपर्यंत वाढवावयाचा, कीं तेथेंच 'खुंटीला टांगून' ठेवावयाचा! ह्या प्रश्नांचा कायमचा निकाल लावण्याकरितां एक बॅबिंगटनस्मिथ कमेटी नेमण्यांत आली.

ह्या कमेटीनें असें ठरविलें कीं, एका रुपयास १६ पेन्स हा भाव जर कायम ठेवला तर रुपये आटवून लोक चांदी परदेशीं पाठविणार. तेव्हां २४ पेन्सांपर्यंत जर हा भाव चढविला तर लोकांना चांदी आटविण्याचा मोह पडणार नाहीं. हल्लींच हुंडणावळीचा भाव चढला असल्यामुळें बाजारांत जिनसांचे भाव

उतरत चालले आहेत व त्यामुळें लोकांना फायदा होत आहे व हा फायदा कायम राखणें इष्ट आहे; कारण लढाईमुळें भयंकर महागाई झाल्यामुळें लोकांत सरकाराविषयीं तीव्र असंतोष माजत चालला आहे व येथील चळवळ्या लोकांना सरकाराविरुद्ध द्वेष पसरविण्यास चांगलें साधन झालेलें आहे. तेव्हां ही राजकीय चळवळ जर हाणून पाडावयाची असेल तर ही महागाई कमी झाली पाहिजे; व ती कमी होण्यास बाहेरचा माल ह्या देशांत स्वस्त भावानें विकला गेला पाहिजे, म्हणजे देशांतला मालही व्यापारी लोक स्वस्त दरानें विकूं लागतील. चांदीचा भाव बदलण्यानें जिनसांच्या किंमती कमी होण्याचें कमेटीच्या मतें असें कारण होतें कीं, पूर्वीं येथील लोकांस एक पौंड किंमतीच्या मालास जे १५ रुपये द्यावे लागत त्याबद्दल त्यांना आतां १० रुपयेच नवीन दरानें द्यावे लागतील. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, ज्या लोकांना ह्या देशांतून माल बाहेर पाठवावयाचा असेल त्यांना आपल्या मालावर जास्त किंमत आकरावी लागेल; कारण त्यांना पूर्वीं एका साव्हरिनबद्दल पंधरा रुपये मिळत होते ते आतां दहाच मिळणार; व त्यामुळें त्यांच्या मालाला बाहेर मागणी कमी येईल. पण ह्यावर कमेटीचें असें मत पडलें कीं, ही स्थिति फार दिवस टिकणार नाहीं. शिवाय हिंदुस्तानच्या मालाशिवाय परराष्ट्रांचें चालत नसल्यामुळें त्या मालाला मागणीही येणारच व हल्लींच हिंदुस्तानच्या मालाला बाहेर इतकी किंमत येत आहे कीं, रुपयाची किंमत २४ पेन्स केल्यामुळें जें नुकसान होईल तें फारसें होणार नाहीं. एकंदरींत सामान्य जनतेच्या हिताच्या दृष्टीनें ह्या नवीन दरानें फायदा होणाऱ्या लोकांचीच संख्या अतिशय भरेल. आणि माल उत्पन्न करणाऱ्या लोकांचें जरी नुकसान झालें तरी हिंदुस्तानांत विलायतेच्या मानानें मजूरी व कच्चा माल स्वस्त असल्यानें येथें जो माल तयार होईल तो युरोपांत स्वस्त दरानें विकणें केव्हाही येथील व्यापाऱ्यांस परवडेल.

(७२) **वरील सूचनांबद्दल चर्चा**—अशा प्रकारची १ रुपयाची किंमत २४ पेन्स करण्याची ह्या कमेटीची विचारसरणी आहे. पण आपण जर सूक्ष्मपणें विचार केला तर ती किती फोल आहे हें सहजच दिसून येईल. तथापि

कमेटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर स्टेट सेक्रेटरीनें कांहीं सूचना अमलांत आणल्या. हुंडणावळीचा भाव १ रुपयास २४ पेन्स ठरविण्यांत आला; पण सोन्याच्या आयातीवरील निर्बंध काढून टाकणें व आंतर्व्यवहाराकरितां १ साव्हरीनास १० रुपये असें दोघांचें प्रमाण ठरविणें वगैरे गोष्टी लांबणीवर टाकण्यांत आल्या. ह्याचा असा परिणाम झाला कीं, हुंडणावळीचा भाव स्थिर होण्याचें बाजूलाच राहिलें. उलट तो दर आठवड्यास बदलूं लागला. ह्यावेळीं सट्टेवाले लोकांचें चांगलेंच फावलें. हे लोक विलायतेला नवीन दराचा फायदा घेऊन पैसे पाठवूं लागले व कालांतरानें हा दर उतरूं लागताच ते पैसे परत आणूं लागले व अशा तऱ्हेनें त्यांनी खूप पैसा मिळविला.

आतां सरकारपुढें मोठाच प्रश्न उभा राहिला. सरकारची अशी कल्पना होती कीं, रुप्याची किंमत खालीं उतरणार नाहीं. पण हा अंदाज सरकारचा सपशेल चुकला. पण एकदा जाहीर केल्यावर तो कायम ठेवणें सरकारास भागच होतें म्हणून नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या विकण्याची त्यानें सुरुवात केली. ह्या हुंड्यांस मागणी अतोनात येऊं लागली ह्याचें कारण असें होतें कीं, ज्या व्यापाऱ्याला विलायतेंत पैसे पाठवावयाचे असतील तो हिंदुस्तान सरकारला २४ पेन्स दरानें पैसे देऊन हुंड्या विकत घेई व ह्या हुंड्या विकत घेऊन विलायतेंत स्टेट सेक्रेटरीकडे पाठविल्या म्हणजे त्याच हुंड्या ३० किंवा ३२ पेन्स भावानें घेऊन तो हुंड्या घेऊन येणाऱ्या इसमास पैसे चुकते करी. ह्याचा अर्थ असा होई कीं, जो हिंदुस्तानाचा पैसा युद्धाचे पूर्वी व युद्ध चालू असतांना १६ पेन्स दरानें विलायतेस नेला गेला तोच पैसा ह्या उलट हुंड्या विकण्याच्या पद्धतीमुळें ३० किंवा ३२ पेन्स ह्या दरानें परत ह्या देशांत येई. अशा आंतबट्ट्याच्या व्यवहारानें हिंदुस्तानास ३५ कोटींचा चट्टा बसला. ह्या हुंड्या विकूं नका असा आक्रोश येथील व्यापारी करीत होते. पण तें सर्व अरण्यरुदिताप्रमाणेंच होतें.

ह्या प्रश्नाचा जितका खोल विचार करावा तितकें सरकारी धोरण चुकीचें होतें अशी आपली खात्री पटते. खरोखर रुपयास १६ पेन्स हा दर बदलून तो

२४ पेन्स करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. हिंदुस्थानांत हल्लीं रुपयाचें कृत्रिम नाणें सुरू आहे. केवळ नाणें कृत्रिम आहे म्हणून कोणी त्या नाण्यास त्याज्य मानीत नाहीं. तुम्ही नाण्यास कोठलीही किंमत द्या, त्यामुळें जोंपर्यंत तें नाणें देशांतल्या देशांत चालू आहे तोंपर्यंत कोणाचेंही नुकसान होत नाहीं. पण एकदां तें नाणें लोकांत प्रचलित झाल्यावर व लोकांचा त्या नाण्याशीं निकट परिचय झाल्यावर मग त्याची किंमत कमीजास्त करणें हें मोठें पाप आहे. विशेषतः ज्यावेळीं अशी किंमत बदलल्यानें सरकारचा फायदा होत असतो त्यावेळीं तर सरकार लोकांशीं मोठीच प्रतारणा करतें. आपण अशी कल्पना करूं कीं, एक दुकानदार आहे व त्याला गिऱ्हाइकाला फसवावयाचें आहे. तेव्हां त्याचा सोधा मार्ग म्हटला म्हणजे खोटीं व लहान वजनें वापरून गिऱ्हाइकांचे पदरांत कमी माल घालणें हा होय. आतां त्याच दुकानदाराला कांहीं माल दुसऱ्या एका खेडेगांवच्या शेतकऱ्याकडून घ्यावयाचा आहे व त्याचे मनांत त्या शेतकऱ्याला लुबाडावयाचें आहे. तेव्हां उत्तम मार्ग म्हटला म्हणजे खोटें व मोठें माप वापरून जास्त माल शेतकऱ्याकडून उपटणें हा होय. हाच न्याय जर आपण हिंदुस्थान सरकाराला लावला तर आपणांस असें दिसून येईल कीं, हिंदुस्थान सरकारला स्टेट सेक्रेटरीस दरवर्षीं १ साव्हरिनला १५ रुपये या दरानें ३१ कोट रुपये द्यावयाचे असतात; पण १ साव्हरिनास १० रुपये ह्या दरानें आतां २० कोटच रुपये त्याला द्यावे लागणार; म्हणजे दरवर्षी ११ कोट रुपयांची बचत हिंदुस्थान सरकारास होणार. हें सर्व सरकारच्या दृष्टीनें ठीक झालें; पण ज्याला परदेशीय व्यापाऱ्यांकडून पैसे घ्यावयाचे असतील त्याची वाट काय? पूर्वी त्याला एका साव्हरिनला १५ रुपये मिळत होते, तर आतां त्याला १० रुपयेच मिळणार; म्हणजे जो फायदा सरकारचा होणार तोच तोटा धान्य वगैरे माल उत्पन्न करणाऱ्या—व असे लोक हिंदुस्थानांत शेंकडा ८० आहेत—शेतकऱ्यांचा होणार. शिवाय ज्याला सावकाराला पैसे द्यावयाचे आहेत, त्याची वाट काय? कारण पूर्वी १ रुपयाला त्याला १६ पेन्स द्यावे लागत असले, तर आतां त्याला २४ पेन्स द्यावे लागणार.

हा हुंडणावळीचा भाव बदलल्यानें दुसरा असा एक परिणाम होणार

आहे कीं, परदेशच्या व्यापाऱ्यांची चांगली पोळी पिकणार व त्यांच्या मालाला ह्या देशांत खूप मागणी येणार; पण येथील बाहेर माल पाठविणारे व्यापारी फजीत पावणार कारण त्यांच्या मालाला कमी मागणी येणार आहे. ह्यावर सरकारचें असें म्हणणें आहे कीं, ही स्थिति फार वेळ टिकणार नाहीं. कारण कीं, युरोपमध्यें फार महागाई आहे व हिंदुस्थानचा माल कितीही महाग झाला, तरी युरोपमधील मालापेक्षां तो स्वस्तच पडणार. पण अनुभवावरून हे कल्पनेचे खेळ आहेत, असें सिद्ध झालें आहे. परवांच हिंदुस्थानचे फडनवीस मि. हेले ह्यांनीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें असें कबूल केलें कीं, हिंदुस्थानच्या मालाला युरोपमध्यें मागणी येईल अशी जी आमची अटकळ होती ती सपशेल फसली.

सरकारचें असें म्हणणें आहे कीं, जिन्नस पैदास करून तो परदेशीं विकणाऱ्याचें ह्या नवीन दरानें नुकसान होईल, असें जरी कबूल केलें तरी परदेशी माल विकत घेणाऱ्या गिऱ्हाइक लोकांना जिनसा स्वस्त दरानें मिळतील हा काय थोडा फायदा आहे ? वादाकरितां ही गोष्ट जरी कबूल केली, तरी ह्या मालाचा उपभोग घेणारे गृहस्थ कोण ? तर श्रीमंत लोक, मोठमोठे विलायती माल वापरणारे व मागणी करणारे व्यापारी व कारखानदार लोक. तेव्हां ह्या लोकांना परदेशी जिनसा स्वस्त मिळाल्या तर सामान्य गरीब माणसांना फायदा कोणचा ? शिवाय हा विलायती माल स्वस्त मिळाल्यामुळें देशी मालाचें गिऱ्हाईक कमी होऊन त्या मानानें देशी उद्योगधंद्यांना धोका येणारच.

सरकारचें असेंही म्हणणें आहे कीं, जिन्नस पैदास करून तो परदेशीं विकणाऱ्यांचेंही फारसें नुकसान होणार नाहीं; कारण महायुद्धामुळें वस्तूंच्या किंमती महायुद्धापूर्वी असलेल्या वस्तूंच्या किंमतीपेक्षां दुपटी तिपटीनें वाढल्यामुळें जरी थोडी कमी किंमत आली तरी ह्या व्यापाऱ्यांनीं फारसें कुरकुरावयाला नको. वस्तुतः सरकारच्या ह्या ह्मणण्यांत फारसा अर्थ नाहीं. कारण हल्लींच सर्व जगभर जिनसांच्या किंमती उतरूं लागल्या आहेत. पण त्या बऱ्याच वाढल्या आहेत असें वादाकरितां गृहीत धरून चाललें तरी व्यापाऱ्यांना परिस्थितीमुळें जास्त नफा होत असला तर सरकारनें कां कुरकुरावें ? व तुम्ही नुकसान परस्पर सोसा असें ह्मणण्यास सरकारास काय अधिकार आहे ?

असो. कोळसा उगाळावा तितका तो काळाच असतो. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे सरकारनें हा जो दर १६ पेन्सपासून २४ पेन्सपर्यंत वाढविला त्याचें अंतस्थ कारण असें होतें कीं, महायुद्धामुळें प्रत्येक राष्ट्रांत बराच माल तुंबुन राहिला होता. इंग्लंडमध्यें डांबून राहिलेल्या मालास युरोपमध्यें त्यावेळीं मागणी नसल्यामुळें मँचेस्टर, लिव्हरपूल येथील गिरण्या राम म्हणण्याचे पंथाला लागल्या होत्या. त्यांच्या मालाला गिऱ्हाईक मिळवूं दिलें नाहीं तर त्यांची फार कठीण स्थिति होणार होती. म्हणून हा दर चढवून त्या शिल्लक राहिलेल्या मालाला हिंदुस्थानांत व्यापाऱ्यांकडून सरकारनें मागणी करावयास लावलें. पण खरी मौज तर पुढेंच आहे. अशी मागणी सुरू होऊन बराच माल उठल्यावर तो मुंबईच्या धक्क्याला लागतांक्षणींच चांदीचा भाव उतरूं लागल्यामुळें पुनः १६ पेन्सवर दर येऊन ठेपला व तेथील व्यापारी सपशेल तोंडघशीं पडले. कारण त्यांना आतां १० रुपयेबद्दल पूर्वीप्रमाणेंच १५ रुपये द्यावे लागणार होते. अशा रीतीनें नवीन दराचा फजीतवाडा उडाल्यामुळें सरकारास विलायतेंत स्टेट सेक्रेटरीवर उलट हुंड्या विकाव्या लागल्या व ३५ कोटींची चाट बसल्यावर मग त्या हुंड्या न विकण्याचें सरकारनें ठरविलें.

---

# भाग ११ वा.

# उपसंहार.

**(७३) चलनपद्धतीबद्दल सरकारास कांहीं महत्त्वाच्या सूचनाः-** अशा प्रकारचा हा चलनी नाण्यांचा मनोरंजक इतिहास आहे. हिंदुस्थानांत ह्या चलनी नाण्याला फार महत्त्व आलेलें आहे; कारण येथील चलनपद्धति हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें सुरू करण्यांत आलेली नसून विलायतसरकारच्या व तेथील

लोकांच्या सोयीकडे पाहून प्रचारांत आणली गेलेली आहे. हिंदुस्तानांत असलेली महागाई खरी नसून हिच्या मुळाशीं कांहीं अंशीं ही सदोष चलनपद्धतीच आहे. तसेंच ह्या अशास्त्रीय चलनपद्धतीमुळें हिंदुस्थानचे क्रोडो रुपये निष्कारण खर्च होत आहेत व हिंदुस्थानांत जें सोनें हक्कानें अलें असतें तें विलायतेंत सुवर्ण गंगाजळी ह्या गोंडस नांवाखालीं गडप होत आहे. ही सर्व स्थिति जर बदलावयाची असेल तर खालीं सुचविलेल्या सुधारणा जरूर झाल्या पाहिजेत.

( १ ) हिंदुस्थानांत एक तर द्विचलनपद्धति सुरू करण्यांत यावी किंवा निर्भेळसुवर्ण चलनपद्धति प्रचारांत आणावी. हिंदुस्थान देश इतर देशांप्रमाणेंच सुधारलेला आहे. जगांतील प्रमुख राष्ट्रांचा जो एवढा उत्कर्ष झाला आहे त्याचें कारण काय आहे हें त्यास पूर्णपणें समजतें. हिंदुस्थानचे लोक रानटी आहेत; त्यांना सोन्याचा उपयोग फक्त दागिने करण्यापुरतांच समजतो; हिंदुस्थान देश हा सोनें गडप करणारी एक मोठी गर्ता आहे; ह्या कल्पना आतां सरकारनें सोडून दिल्या पाहिजेत; व गोल्डएक्सेंजस्टँडर्ड पद्धतीला मूठमाती दिली पाहिजे. प्रथम रुपयाचें नाणें चालू असतांना एकदम सोन्याचें नाणें सुरू केलें तर घोंटाळा उत्पन्न होईल; तो टाळण्याकरितां ही गोल्डएक्सेंजस्टँडर्ड पद्धति तात्पुरती हिकमत म्हणून अमलांत आणण्यास हरकत नाहीं; पण ही पद्धति कायमची एखाद्या देशावर लादणें म्हणजे त्या देशाला आर्थिक दृष्ट्या कायमचें खच्ची करण्यासारखें आहे. ही पद्धति सदोष आहे असें केवळ हिंदुस्थानचेच लोक म्हणत नाहींत, तर खुद्द हिंदुस्थान सरकारचें मतही १८९८ सालापर्यंत तसेंच होतें; व विलायतेच्या व्यापारी वर्गाचें व सरकारचें दडपण जर स्टेट सेक्रेटरीवर पडलें नसतें तर ह्या देशांत सुवर्णचलनपद्धति केव्हांच सुरू झाली असती. ह्या बाबतींत सर रिचर्ड टेंपल साहेबांचें मत नमूद करण्यासारखें आहे. ' माझें असें बरेंच दिवसांपासून मत झालेलें आहे कीं, हिंदुस्थानांत हळूं हळूं कां होईना सोन्याच्या नाण्याची सुरवात झाली पाहिजे व त्याच दृष्टीनें हिंदुस्थान सरकारनें उपाय योजले पाहिजेत. एकंदरींत मला असें दिसतें कीं, हिंदुस्थान सरकार राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्यांत सर्वोत्कृष्ट अशीं तत्वें अमलांत

आणीत असतांना फक्त चलनी नाण्याच्या बाबतींत दुय्यम तत्त्वांचा अवलंब करीत आहे.'

(२) हिंदुस्थानांत कृत्रिम नाणें सुरू करण्यांत आल्यामुळें हुंडणावळीच्या भावांत चांचल्य उत्पन्न होऊं नये म्हणून जी सुवर्णगंगाजळी ठेव विलायतेंत ठेवण्यात आलेली आहे तिचा बराच भाग हिंदुस्थानांत ठेवण्यांत आला पाहिजे. चेंबरलेन कमिशनचें मत कांहींही असो, आमची पूर्ण खात्री झालेली आहे कीं, ह्या सोन्याच्या ठेवीचा जर जगांतल्या अत्यंत गरीब अशा देशांतल्या लोकांच्या निढळाच्या घामाच्या पैशापासून जन्म झालेला आहे तर त्या ठेवीचा फायदा येथील लोकांसच झाला पाहिजे. हिंदुस्थानांत उद्योगधंद वाढविण्याची अत्यंत अवश्यकता आहे व पुष्कळ कला व व्यापार योग्य उत्तेजनाभावीं मृत्युपंथास लागले आहेत. असें असतांना विलायतेच्या व्यापाऱ्यांना स्वस्त व्याजानें रकमा देऊन हिंदुस्थानच्या उद्योगधंद्याची गळेचेपी करणें हें महत्पाप होय. हिंदुस्थानांत सुवर्ण नाणें सुरू झाल्यावर ह्या सुवर्णनिधीची जरूरीच भासणार नाहीं. पण जोंपर्यंत ह्या देशांत सोन्याचें नाणें सुरू होत नाहीं तोंपर्यंत ही गंगाजळी ठेव होतां होईल तों हिंदुस्तानांत असली पाहिजे व तिचा उपयोग येथील व्यापाऱ्यांस झाला पाहिजे.

(३) स्टेट सेक्रेटरीनें ज्या हुंड्या विकावयाला काढावयाच्या त्या त्यानें आपल्या गरजेपुरत्याच काढिल्या पाहिजेत. विलायती व्यापाऱ्यांची सोय पहाण्याचें त्याचें काम नाहीं. हिंदुस्थानला त्याचा बाहेर जाणारा माल आयात मालापेक्षां केव्हांही जास्त असल्यामुळें इतर राष्ट्राकडून पैसा घ्यावयाचा असतो; व स्टेट सेक्रेटरीचा ३१ कोट रुपये खर्च भागल्यावर बाकीचा जो पैसा ह्या देशाला घ्यावयाचा असतो तो पैसा स्टेट सेक्रेटरीनें फाजील हुंड्या विकावयास न काढल्या तर सोन्याचें रूपानें येथें येईल. ह्या सोन्याचे जोरावर सोन्याचें नाणें सर्रास सुरू करतां येईल व आपोआप खऱ्या स्वरूपाचा सुवर्णनिधि निर्माण करतां येईल. हल्लीं स्टेट सेक्रेटरी वाजवीपेक्षां फाजील हुंड्या विकीत असतो ह्याचें कारण हिंदुस्थानास बाहेरच्या राष्ट्रांकडून सोनें मिळूं नये ही याची इच्छा होय. हें धोरण सर्वस्वीं अनिष्ट होय हें सांगणें अनवश्यक आहे.

(४) पण ह्या सर्व सुधारणा अमलांत येण्यास मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे हिंदुस्तानास आर्थिक स्वातंत्र्य मिळलें पाहिजे. हल्लीं स्टेट सेक्रेटरी व त्याचें कौंसिल विलायतेमध्यें आहे व येथील लोकांनीं व क्वचित प्रसंगीं हिंदुस्थान सरकारनें लोकांच्या हिताच्या दृष्टीनें एखादी योजना सुचविली तर स्टेट सेक्रेटरीला ती विलायत सरकार व विलायती व्यापाऱ्यांचे हितचिंतक ह्यांचेसमोर मांडावी लागते; व हिंदुस्तानचे हितसंबंध विलायतेच्या हितसंबंधांच्या आड येऊं लागले तर ह्या देशास कोणी वाली नसल्यानें इंग्लंडच्या धोरणाचा हिंदुस्तानवर पगडा बसतो. ह्याकरतां स्टेट सेक्रेटरीच्या जमाखर्चखात्यांत हिंदुस्तानचे लोक पाहिजेत व त्या खात्यावर हिंदुस्थानमधील लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची हुकमत पाहिजे. वाटेल ते हुकूम स्टेट सेक्रेटरीनें सोडावे व येथील सरकारनें ते निमूटपणें पाळावे ही तांबदारी आतां पुरे झाली.

(५) हल्लीं हिंदुस्थानांत नाणें पाडण्याच्या बाबतींत लोकमत बिलकूल विचारलें जात नाहीं. देशांत नाणीं किती पाहिजेत हें सरकार स्वतःला सर्वज्ञ समजून ठरवीत असतें. ही गोष्ट फार अनिष्ट आहे जी चलनपद्धति सरकारी अधिकाऱ्यांच्या लहरीवर अवलंबून असते ती चलनपद्धति सर्वस्वीं त्याज्य होय. हिंदुस्थान सरकास आपणांस खुल्या व्यापाराचे पुरस्कर्ते समजतें; ह्या खुल्या व्यापाराचें तत्त्व चलनपद्धतीच्या बाबतींत अमलांत आणण्याचें जर सरकारनें ठरविलें म्हणजे नाणीं किती पाडावयाचीं ह्या बाबतींत व्यापारी वर्ग व तज्ज्ञ ह्यांचा सल्ला जर त्यानें घेतला तर हिंदुस्थानास हा मार्ग फार फायदेशीर होईल. सर्वस्वीं सरकारच्या हुकमतीखालीं असलेल्या पद्धतीचा बोजवारा चोहोंकडे उडालेला आहे, असा जर आपला अनुभव आहे तर हिंदुस्थानांत ती पद्धत कां चालूं रहावी हें समजणें कठिण आहे. तेव्हां आमची अशी सूचना आहे कीं, सरकारी अधिकाऱ्यांवर सर्वस्वीं अवलंबून न राहतां नाणीं व नोटा पाडण्याच्या बाबतींत लोकमत सरकारनें विचारांत घेत जावें.

---

समाप्त.

# शुद्धीपत्र.

—:०:—

| पान. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- |
| १७ ओळी १२-१५ | तात्विकदृष्ट्या ...असावें | तात्विकदृष्ट्या विचार केला तर सोन्याचें नाणें मोठ्या प्रमाणांत पैशाचे व्यवहार करण्याकरितां, व चांदीचें नाणें किरकोळ व्यवहाराकरितां सुरू केलेलें असावें. |
| २२ ओळ १६ | | १६ ह्या आंकड्यानंतर **चलनी नोटा** असें वाचणें. |
| ३२ ओळ १४ | | ‘ दोनदां गेलीं काय व ’ नंतर दोन हा शब्द वाचणें. |
| ३३ ओळ ६ | | नाण्यांतील ह्या शब्दापुढें आटविलेलें हा शब्द वाचणें. |
| ३४ ओळी ११–१२ | व्यापाऱ्यांची प्रवृत्ति जिनसांच्या ... किंमतीपेक्षां | व्यापाऱ्यांची प्रवृत्ति जिनसांच्या किंमती सोन्याच्या किंमतीपेक्षां अगोदरच. |
| ३६ ओळ १४ | | १९ व्या शतकांतील वगैरे वाचण्यापूर्वी (२३) विषय प्रवेश हें वाचणें. |
| ३७ ओळ ११ | १९२० सालीं | १८९९ सालीं. |
| ,, १७ | पांचवा भाग १९९० पासून | पांचवा भाग १८९९ पासून. |

| पान. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|
| ४० ओळ १९ | | कायदा ह्या शब्दानंतर एक अवतरण चिन्ह वाचावें. |
| ४३ ओळ १५ | | होईल ह्या शब्दानंतर एक अवतरण चिन्ह व अर्धविराम चिन्ह वाचावें. |
| ४३ ओळ २३ | | दिसून येते ह्या शब्दांनंतर स्वल्पविचिन्ह वाचणें. |
| ५२ ओळ १३ | | 'तूर्त तरी' ह्याच्यापुढें असलेली फुली तेथें न समजतां २३ व्या ओळींत 'येऊं नये' ह्यापुढें ती आहे असें समजावें. |
| ५४ | सुवर्ण परिमाण पद्धति | सुवर्णपरिमाणपद्धति. |
| ५६ ओळ ७ | न हिंदु न यवनः | न हिंदु र्न यवनः |
| ५७ ओळ २१ | एडवर्डलॉ | एडवर्ड लॉ. |
| ५८ ओळ ४ | करण्यांत यावीं | करण्यांत व्हावा. |
| ५९ ओळ १८ | रोख्यांच्या रूपानें असतां | रोख्यांच्या रूपानें असतो; |
| ६० ओळ २० | | आहे ह्या शब्दानंतर ¶ असें चिन्ह वाचावें. |
| ६५ ओळ ८ | | त्यासंबंधानें ह्या शब्दानंतर स्वल्पविराम वाचणें. |
| ६८ ओळ ६ | बाकी होतां | होती* |

| पान. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|
| ८२ ओळ ७ | असे ठरलें | असें ठरलें; |
| ,, ८ | करण्यांत यावा. | करण्यांत यावा |
| ८३ ओळ ४ | सुरू झाला | सुरू झाला. |
| ,, ११ | नोटाच | नोटांचा |
| ९० ओळ २० | १९०७ चा | १९२० चा |
| ९५ ओळ ११ | महत्व ना | महत्व नाहीं. |
| १०५ ओळ १० | २५२२१५ | २५·२२१५ |
| १०७ ओळ १४ | | होम चार्जेस निमित्त सुमारे |
| १०९ ओळ २१ | चद्धत | पद्धत |
| ११२ ओळ १४ | ( ७६ ) | ( ६६ ) |

**सूचना:—**

पुस्तक फार घाईनें छापावें लागल्यामुळें शुद्धाशुद्धतेच्या चुका राहून गेलेल्या आहेत, त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. वर ठळक चुक्याच आम्हीं निर्दिष्ट केल्या आहेत.

